# नवभारत

सप्टेंबर २०१३

- मराठी 'जनभाषा' : स्वरूप आणि दिशा
- भाषेसाठी ज्ञानाचाच बळी द्यायचा का?
- ब्रिटिश राजवटीत विदर्भात जात, वर्ग आणि संस्कृती : १८५३ ते १९४७
- जागतिक अस्वस्थ लोकमानस : एक कारणमीमांसा
- पाणीटंचाई-दुष्काळ-दारिद्र्याचे मूळ कारण प्रचलित विकासधोरण आहे
- कुरुंदकरप्रणीत धर्मनिरपेक्ष महात्मा गांधी
- कालाय तस्मै नमः
- केंद्रीय अर्थसंकल्प २०१३-१४ : वचने किम् दरिद्रता?

अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*3. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६६। अंक १२। सप्टेंबर २०१३
श्रावण / भाद्रपद शके १९३५
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दल जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका

# नवभारत

## सप्टेंबर २०१३

## अनुक्रमणिका



आदरांजली

डॉ. नरेंद्र दाभोलकरांच्या दु:खद हत्येने प्राज्ञपाठशाळामंडळ आणि 'नवभारत' मासिकाचा सर्व परिवार अत्यंत दु:खी आहे. प्राज्ञपाठशाळामंडळाशी नरेंद्र दाभोलकरांचा अतिशय जवळचा संबंध होता. मंडळाच्या वास्तूत अंधश्रद्धा निर्मूलनाच्या कार्यशाळा आयोजित होत असत. डॉ. दाभोलकरांनी 'नवभारत' मासिकासाठीही लेखन केलेले आहे. त्यांचे अंधश्रद्धा निर्मूलनाचे कार्य हे सर्वसामान्य लोकांच्या हिताचे, त्यांना बुवाबाजीच्या जाळ्यातून सोडविणारे अत्यंत महत्त्वाचे कार्य होते आणि आजही आहे. त्यांनी निर्माण केलेले शेकडो कार्यकर्ते त्यांचे कार्य पुढे नेतील यात शंका नाही. साधना चे 'संपादक' म्हणून आणि अतिशय तळमळीचे सामाजिक कार्यकर्ते म्हणून सर्व महाराष्ट्रभर ते लोकप्रिय होते. विवेकाची पताका खांद्यावर घेऊन सातत्याने लेखन करणाऱ्या या खंद्या लढवय्याच्या अशा निर्घृण हत्येने प्राज्ञपाठशाळामंडळाचा सर्व परिवार अत्यंत दु:खी आहे. त्यांच्या विचारांचा आणि अंधश्रद्धा निर्मूलनाच्या चळवळीचा पाठपुरावा सतत करणे हीच त्यांना खरी आदरांजली आहे. प्राज्ञपाठशाळामंडळ आणि 'नवभारत'चे संपादक मंडळ त्यांच्या कुटुंबीयांच्या दु:खात सहभागी आहे.

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
आमचे नवीन प्रकाशन

# साहित्याचे तर्कशास्त्र

## (तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची साहित्यविषयक अध्यक्षीय भाषणे)

**संपादक : सीताराम रायकर, द. दि. पुंडे, पंडित टापरे**

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी अनेक प्रसंगी साहित्यावर आपल्या भाषणांमधून जे विचार मांडले त्या भाषणांचा हा संग्रह मराठी साहित्याच्या अभ्यासकांना आणि सर्वसामान्य वाचकांनाही मार्गदर्शक ठरावा असा आहे. या ग्रंथात शास्त्राजींनी संस्कृत साहित्यशास्त्राचे विचारमंथन तर केलेले आहेच, या खेरीज त्यांनी आधुनिक साहित्यविचाराचीही दखल घेतलेली आहे. हा ग्रंथ मराठी साहित्याच्या अभ्यासकांना अतिशय मौल्यवान ठरावा असाच संपन्न झालेला आहे.

संपादन मंडळाने प्रदीर्घ प्रस्तावना सुरुवातीस देऊन या ग्रंथाचे मोल अधिकच वाढविले आहे.

पुष्ठे : ४२+ ४३७ किंमत रू. ७५०/-

संपर्क : चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ,
३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा.

अनुक्रमणिका






# मराठी 'जनभाषा' : स्वरूप आणि दिशा

नीलकंठ गोपाळ मेंढे

त्या दिवशी मी एका नगरपरिषदेच्या गावात माझ्या मित्राच्या भेटीला गेलो. एका लहान मुलाला मी माझ्या त्या मित्राचं घर कुठे आहे म्हणून विचारले; तेव्हा तो म्हणाला, 'ते कोकोनुट ट्री आहे ना, तेथून वळा'.... वगैरे वगैरे... बहुतेक तो के जी-१, के जी-२ मध्ये शिकणारा विद्यार्थी असावा. माझ्या समोर प्रश्न उभा राहिला, की-'कोकोनुट ट्री' या शब्दातून त्या मुलाला भारतीय संस्कृतीतील नारळाच्या झाडाचं महत्त्व व संस्कृती किती कळली असावी? हा सांस्कृतिक संस्काराचा भाग इथल्या व्यवस्थेनं लहानपणापासूनच जर त्याच्यापासून हिरावून घेतला, तर एक प्रकारचे सांस्कृतिक कोरडेपण, कृतघ्नतेची भावना, प्रेम, जिव्हाळा, नैतिकता, शहाणपण, परोपकार इ. गुणांची ऱ्हासशीलता सुरू होऊन शहरी संस्कृतीतील मानवी संबंधातील कोरडेपणा, दूरान्वयाची प्रवृत्ती वाढीस लागेल. हळूहळू माणसं माणसांपासून दूर होत होत भौतिक समृद्धीतच धन्यता मानू लागतील. आणि मग त्यातून निर्माण झालेल्या एकटेपणाच्या व पुढे नैराश्याच्या गर्तेत फेकली जातील. आज आपण ज्या भौतिक समृद्धीची सुरुवात करीत आहोत, ती एका दुष्टचक्राची नांदी असते!

साधारणपणे १९६० नंतर किंवा स्वातंत्र्योत्तर काळानंतर सुशिक्षित झालेली पिढी, १९९० नंतर जागतिकीकरणामुळे झालेली ज्ञान-विज्ञान क्षेत्रातील प्रगती, भौतिक सुख-समृद्धीच्या अंगाने होणारे परिवर्तन आणि बालकांना जागतिकीकरणाच्या स्पर्धेत उतरविण्यासाठी पालकांमध्ये चाललेली रस्सीखेंच प्रखरपणे जाणवू लागली आहे. आज देशात परदेशी गुंतवणुकीचे राजकारण जोर धरू लागले असून स्वदेशी निष्ठा मोडीत निघू पाहत आहे आणि बहुतेक सामान्य जनता आणि विचारवंतही त्याच दिशेनं चिंतन करू लागतात, तेव्हा एका सांस्कृतिक आणि त्याच वेळी नैसर्गिक संपत्तीच्या विनाशाकडे अख्खी मानवजात वळत आहे, याची तीव्रतेने जाणीव होते. लोकभाषा आणि लोकसंस्कृतीच्या विनाशामागे जागतिकीकरण, सरकारी धोरणातील आडमुठेपणा, दूरदर्शीपणाचा अभाव ही कारणे समोर येताना दिसतात.

जागतिकीकरणामुळे नैसर्गिक संपत्ती, त्यातील खनिजे इ. ची मोठ्या प्रमाणात खरेदी-विक्री होते. त्यामुळे तिथली भाषा व मानवी संस्कृतीच नष्ट होऊन ते विस्थापित होतात. विस्थापनाच्या प्रक्रियेला वेग आल्यामुळे तिथल्या संस्कृती-भाषा-बोली कशा नष्ट होतात, याची आकडेवारी डॉ. भालचंद्र नेमाडे यांनी दिली आहे. ते म्हणतात, "उत्तर अमेरिकेत कॅनडा आणि युनायटेड स्टेट्‌समधल्या भाषा या शंभर वर्षांपूर्वी १८७ होत्या. रेड इंडियन, एस्किमो यांच्या धरून आज त्यांतल्या ३८ उरल्या आहेत, बाकीच्या नाहीशा झाल्या. अलास्कामध्ये २० भाषा होत्या. आज तेथे २ भाषा राहिल्या आहेत. ही जागतिकीकरण करू इच्छिणाऱ्या गोऱ्या लोकांची कर्तबगारी.' .....'लॅटीन अमेरिकेत बरंच यूरोपियन सांस्कृतिक दडपण अजूनही आहे. तिथे ४०० भाषा होत्या. आता फक्त १०८ भाषा राहिल्यात. पुढील २० वर्षांत झपाट्यानं त्या नाहीशा होतील, अशी भीती आहे.' पुढे ते म्हणतात, 'आज आपल्याकडे १६५२ भाषा गेल्या खानेसुमारीनुसार जिवंत बोलल्या जातात. ह्यूमन राइट्‌सच्या रेकॉर्डमध्ये तुमच्या देशात किती भाषा तुम्ही मारून टाकल्या, याचीही कसोटी ठेवली पाहिजे." [१]

जागतिकीकरण म्हणजे जगातील वेगवेगळ्या मानवी संस्कृतींतील लोकांनी एकमेकांना भेटणं, संवाद करणं, व्यापार करणं. अशा स्वरूपाच्या जागतिकीकरणाची दीर्घ परंपरा भारताला आहे. हिन्दुस्थानच्या माणसांनी आग्नेय आशियातल्या ईशान्येकडच्या देशांत जाणं; लाओस, कंबोडिया, थायलंड तसेच मलेशिया, इंडोनेशिया इ. भागांत जाणं किंवा त्यांनी इकडच्या भागात येणं यातून सांस्कृतिक दृष्ट्या एकमेकांना जोडलं जाणं हे पूर्वीपासूनच सुरू आहे. अरबी व्यापाऱ्यांनी व भटक्या टोळ्यांनी इकडील







अनुक्रमणिका

ज्ञान तिकडे युरोपात व जगभरात नेलं. रामायण–महाभारतादी महाकाव्यांचा जरी विचार केला, तरी त्याची कितीतरी रूपं व कथानकं आपल्याला तिकडे विकसित-रूपांतरित झाल्याचं दिसून येतं.

परंतु, वरीलप्रमाणे आजच्या जागतिकीकरणाचे स्वरूप मात्र निश्चित नाही. आजच्या जागतिकीकरणाचं स्वरूप स्पष्ट करताना प्रा. रंगनाथ पठारे म्हणतात, "जागतिकीकरणाचा आजचा हा चेहरा अमानवी आहे. त्यात देवाणघेवाण नाही. ताकदवान, धनदांडगे देतील ते बाकीच्यांनी घ्यायचं. त्यांच्या तालावर नाचायचं. जगा म्हणतील तोवर जगायचं. त्यांना तुम्ही उपयोगाचे राहिला नाहीत, तर मरायचं.....गरीब देशांनी आपल्या सांस्कृतिक व्यवस्था धनदांडग्यांसाठी खुल्या करायच्या. त्यांनी आपल्या देशात काय व कसं जगायचं; कायदा व न्यायाची व्यवस्था कशी ठेवायची, हेसुद्धा हे दांडगे ठरविणार."[२] अशा या भीषण स्वरूपाच्या जागतिकीकरणामुळे आपल्या भाषा, बोली, संस्कृती आणि मूल्यव्यवस्था धोक्यात आल्यामुळे त्या संदर्भातील उपययोजना करणे; भाषा, संस्कृती आणि निसर्गरक्षणाचे भान निर्माण करणे गरजेचे आहे.

मनुष्य हा प्राणी आपल्या बोलभाषेत–मातृभाषेतच विचार करू शकतो. ती त्यांच्या जीवनव्यवहाराची, कलात्मक अभिव्यक्तीची व चिंतनाचीही नैसर्गिक भाषा असते. भाषा ही एक सामाजिक संस्था आहे. भाषा-निर्मितिसंदर्भात अनेक व्युत्पत्ती जरी भाषावैज्ञानिकांनी सांगितल्या असल्या, तरी जीवनव्यवहार सुकर करणे हाच त्यामागील एकमेव उद्देश आहे. या भाषेतूनच त्या विशिष्ट भाषिक समूहाची संस्कृती, कला, सत्त्व आणि स्वत्व सिद्ध होत असते. म्हणूनच मराठी माणूस म्हटला, की त्याची एक स्वतंत्र ओळख आहे, मानसिकता आहे.

आपल्या दैनंदिन जीवनव्यवहारासाठी समाज जी भाषा वापरतो, तिला मातृभाषा म्हणतात. मुख्य भाषा आणि तिच्या बोली यांचा संबंध एखाद्या महावृक्षाचे खोड आणि त्याच्या फांद्यांसारखा असतो. मराठी भाषिकांचा क्षेत्रविस्तार हा एक लाख चौरस मैलांच्यावर असून महाराष्ट्र आणि निकटच्या प्रांतांतील मराठी भाषिकांची लोकसंख्या ही दहा कोटींहून अधिक आहे. प्रमाण भाषेला व्याकरण आणि लेखनाच्या नियमांनी युक्त अशी शिष्टमान्यता असते; तरी पण प्रमाण भाषा ही एखादी विशिष्ट भाषा नसते, तर सोय आणि गरज या दृष्टीने एखाद्या मध्यवर्ती बोलीलाच प्रमाण भाषेचे रूप दिले जाते. आज महाराष्ट्रात वऱ्हाडी, नागपुरी, झाडी, दखणी, कोंकणी, अहिराणी, मराठवाडी, हलबी, डांगी इ. मराठीच्या काही महत्त्वाच्या बोली आहेत. त्याचप्रमाणे काही जाती–जमाती–समूहांच्याही बोली आहेत. प्रमाण भाषेच्या तुलनेत बोली या अशुद्ध, गावंढळ, ग्राम्य व खालच्या प्रतीच्या मानण्यात येतात. खरं म्हणजे माणसामाणसांत संवाद साधणारी कोणतीच भाषा किंवा बोली ही अशुद्ध किंवा गावंढळ नसते.

बोली हे दैनंदिन व्यवहारातले एक स्वाभाविक साधन आहे. परिस्थितीच्या अनुरूप भाषिक सामग्री तो समाज मुखपरंपरेने उपयोगात आणतो. त्यामुळे एक प्रकारचा जिवंतपणा त्यात असतो. ती साधी व परिणामकारक असते. तिची स्वाभाविकता हे तिचे वैशिष्ट्य आहे. ती कुणाला कशी वाटते हे, ज्याच्या-त्याच्या संस्कारांवर अवलंबून असते. प्रमाण भाषेतूनच बोली निर्माण झाल्या, बोली या प्रमाणभाषेची भ्रष्ट रूपे होत इ. बोलींबद्दलचे अनेक गैरसमज विद्यापीठीय लोकसाहित्याच्या अभ्यास –संशोधनातून व शिबिरांमधील परिसंवादांमधून दूर झाले आहेत.

**संस्कृत भाषाकोविदांचे वर्चस्ववादी राजकारण :**

बोलीतूनच प्रमाण भाषेची निर्मिती होत असते. परंतु त्यासाठी कोणत्याही एका विशिष्ट भाषिक प्रदेशाचीच बोली प्रमाण मानणे, हे इतर बोलींवर अन्याय करण्यासारखे असते. त्यामुळे ज्या संस्कृतमधून मराठी भाषेची निर्मिती झाली, अशी 'देवभाषा' म्हणवली जाणारी संस्कृत ही पुण्याच्या चित्पावन ब्राह्मणांची बोलीभाषा होय. ती संपूर्ण महाराष्ट्राची, सर्व मराठी बोली भाषिकांची प्रमाण भाषा असणे, हे अन्यायकारक नाही का?

अलीकडच्या व प्राचीन संस्कृतगौरवाच्या काळात आज ही भाषा बोलणाऱ्या समूहाचे स्वरूप पाहिले, तर १९५१ च्या खानेसुमारीनुसार मातृभाषा संस्कृत असलेले केवळ ५५१ भारतीय आहेत, तर १९७१ च्या खानेसुमारी-नुसार १२४८ लोक संस्कृत मातृभाषिक आहेत. यावरून असे दिसते की संस्कृत ही बहुसंख्याकांची व्यवहारभाषा






नसून केवळ अतिअल्पसंख्याकांची ग्रंथभाषाच आहे. व्याकरणकार पाणिनीच्या अष्टाध्यायीपासून (इ.स. पूर्व ४००) म्हणजे संस्कृतच्या वास्तविक संभवापासून-आजपर्यंत संस्कृत ही कधीच व्यवहारभाषा नव्हती. "प्रसिद्ध भाषासंशोधक T. W. Rhys Davids Va संस्कृतला Hybrid भाषाच मानतो. इ. स. पूर्व ६०० च्या सुमारास जी पाली (मागधी) उत्तरेकडे प्रचलित होती, तिच्याच माध्यमातून महात्मा बुद्धाने लोकांशी धम्मसंवाद साधला व भगवान महावीराने त्या काळी बोलल्या जाणाऱ्या अर्धमागधीत लोकसंवाद साधला. मागधी, अर्धमागधी, शौरसेनी, पैशाची, 'महाराष्ट्री या सर्व प्राकृत लोकभाषा होत्या व इ. स. १५०० च्या सुमारास झालेल्या आर्यांच्या आक्रमणाआधी भारतभर पसरलेल्या नागांच्या सिंधुसंस्कृतीच्या (इ. स. पूर्व ४५००) मूळ भाषेतून त्यांचा जन्म झाला होता. गोंडवनाच्या विस्तीर्ण प्रदेशात बोलली जाणारी गोंडी तसेच ओराओ, कुई, कंधी, कोलामी या मूळ द्रविड भाषा असून गोंडी हे पाली-प्राकृतचे पूर्वकालीन रूप म्हणता येईल, असे अंतर्गत पुरावे मिळतात."[३]

वैदिक आणि द्राविड या भाषा सामान्यपणे समकालीन दिसतात. तमिळ, कन्नड, तेलुगू, मल्याळम, तूळू या पंचद्रविड भाषासुद्धा वरीलपैकी कोणत्यातरी मूळ द्राविड प्राचीन भाषेतून निपजलेल्या आहेत. "डॉ. चॅटर्जी आणि जयनाथ पाती यांच्या मते तर वैदिक संहितारचनेत केवळ भाषिक रूपांबाबतच नव्हे तर धार्मिक कल्पनांबाबत-देखील गोंडी, तुरानी, द्राविडियन, कोलारीयन भाषा-साहित्याचा स्वीकार करण्यात आल्याचे जाणवते. वैदिक संहिता या गोंडी साहित्याच्या रूपांतरित प्रतिकृती असल्याबाबतच्या या त्यांच्या धारणेला डॉ. सोहनलाल शर्मांचाही दुजोरा आहे. पुढे गोंडी, पाली, द्राविड या भाषांमधून हजारो शब्द आणि शेकडो धातू उचलून आणि त्याचा उद्भ्रंश करून संस्कृत ही संयुक्त भाषा (Hybrid) घडविण्यात आली. पाणिनीने तिचे नियमन-- व्यवस्थापन करणारे व्याकरण शोधून दिले. पुढे कात्यायनकाळात तत्सम शब्दांचे अर्थही पाणिनीकाळाच्या तुलनेत बदललेले दिसतात. एकंदरीत सर्व बाबींचा निष्कर्ष असा, की द्राविड भाषा या संस्कृतहून अधिक प्राचीन आहेत."[४] पुढे इ. स. २०० मध्ये संस्कृत Hybrid या भाषेने ब्राह्मी लिपी स्वीकारली आणि परिपूर्ण भाषा म्हणून संस्कृत ही एक अधिकृत भाषा बनली. इ.स.च्या ४थ्या व ५व्या शतकांत संस्कृत ही एकमात्र साहित्यभाषा बनली व पुढे स्त्री-शूद्रांना वेदशास्त्राच्या अध्ययनाचाच अधिकार नाकारण्यात आला.

जी भाषा बोलण्याचा व शिकण्याचा अधिकारच जर एखाद्या उच्चवर्णीय व्यवस्थेकडून बहुजनांना-मातांना नाकारण्यात येत असेल, तर ती कुणाची 'मातृभाषा' तरी कशी बनू शकेल? "द्राविड मूळ असलेल्या गोंडी, पालीसारख्या प्राचीन लोकभाषांचा प्रभाव मिटविण्यासाठी संस्कृत ही त्या भाषांमधली शब्दरूपे उद्भ्रष्ट करून उबविण्यात आली. त्याच प्राचीन लोकभाषांमधून अपभ्रंश भाषाही अस्तित्वात आल्या आणि त्यातूनच पुढे पंजाबी, बंगाली, मराठी, आसामी, उडिया इ. आधुनिक प्रदेश-भाषाही जन्मल्या. अर्थात संस्कृत ही संस्कारित (परिष्कृत) भाषा असून तिचा उगम भारतातील तत्कालीन बोलीभाषांमधून झालेला आहे."[५] असे मत जनसाहित्याचे अभ्यासक डॉ. सुभाष सावरकर मांडतात. प्रा. पुरुषोत्तम सदार , प्रा. म. देशमुख यांचे म्हणणे तर असेही आहे, की २.५ लाख वर्षांपूर्वी विदर्भात मानवी वसाहती होत्या. त्यांची भाषा 'मरहट्टी' असून तीच पाली, पैशाची व संस्कृतचोही मूळ भाषा होय.

१८१८ मध्ये पेशवाई बुडाली. त्या ब्रिटिश राजवटीच्या काळात महात्मा जोतीबा फुले आणि युरोपियन-अमेरिकन परिवर्तनवादी लोकांनी मानवतावादाच्या अनुरोधाने स्त्री-शूद्र-प्रौढांना शिक्षित करण्याचा जो ध्यास घेतला होता, त्यातून व त्यांच्या स्वतंत्र चिंतनातून शिक्षण व सामाजिक क्षेत्रांत समानतेच्या अंगाने येणारा विचारही त्यांनी मांडला. हा विचार त्यांनी ग्रामीण-नागर लोकभाषेच्या अंगाने मांडला. त्याच वेळी या चळवळीदरम्यानच्या काळात पुण्याच्या गंगाधरशास्त्री फडके, दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर, गोडबोले, रा. भि. गुंजिकर इ. मंडळींनी आपल्या ब्राह्मणी बोलीचे व्याकरणही सुनियोजित पद्धतीने रचले. याच व्याकरणाच्या बळावर फुल्यांना व्याकरण समजत नाही, म्हणून विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी आपल्या निबंधमालेतून म. फुल्यांची यथेच्छ










टिंगलटवाळीही केली.

पुढे जागतिक कीर्तीच्या भाषासंशोधकांनी 'प्राथमिक शिक्षण हे मातृभाषेतूनच द्यावे', असा आग्रह धरून इथल्या मूळ भारतीय निवासी मुलांना शिक्षणासाठी भाषामाध्यम निश्चित करण्याची जबाबदारी एका ब्रिटिश अधिकाऱ्यावर सोपविली गेली. त्याने त्यासाठी शिक्षण-खात्यातील विद्वानांची नेमणूक केली. त्या वेळी या विद्वानांनी १८५७ साली प्रसिद्ध झालेल्या मोल्सवर्थ-कँडी यांचा मराठी-इंग्रजी कोश, पुण्याच्या पंडितांनी रचलेली व्याकरणे व १९२७-२८ मध्ये जॉर्ज ग्रिअर्सनने प्रसिद्ध केलेले भाषाअहवाल यांचा गैरफायदा घेत आपल्या स्वतःच्याच ब्राह्मणी गटसमूहाची भाषा पुढे सरकावून व तिच्यातच अभ्यासक्रम बनवून १९३० मध्ये शासनास सादर केला. अशा प्रकारे खानदेशी, नेमाडी, तावडी, दखनी, हळबी, डांगी, आगरी, कोकणी, वऱ्हाडी, नागपुरी, झाडी या मराठीच्या प्रचलित मराठी बोली व त्यांच्या उपबोली या मराठीच्या बोलींना डावलून केवळ पुणेरी ब्राह्मणांच्याच बोलीला 'प्रमाण मराठी भाषा' हे बिरुद लावून दिले. यालाच पुढे डॉ.श्रीधर व्यंकट केतकरांनी 'सदाशिवपेठी' पुणेकरांची भाषा म्हटले आहे. पुढे मराठीचे शिवाजी म्हणवून घेणाऱ्या विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी आपल्या निबंधमालेतून संस्कृतप्रचुर व पल्लेदार भाषेत निबंध लिहिले. परंतु "अशा पल्लेदार व क्लिष्ट भाषेत रूपसिद्धी, व्युत्पत्ती आणि शब्दसंग्रह यांच्यात नेमकेपणा येतो हे खरे असले, तरी पण त्याच वेळी ती निर्जीवही होत जाते, हे त्याहूनही खरे. कारण भावना-संवेदनांचे सामर्थ्य तिच्यातून उणावलेले असते."[६]

त्यामुळे आजही विद्यापीठपातळीवर हे गृहीत धरूनच शिकविले जाते, की मराठी भाषा ही संस्कृतमधून जन्मली असून, तिच्यातील बहुतेक शब्दांची व्युत्पत्ती संस्कृतमधून दाखविण्यासाठी त्यांना हव्या तेवढ्या कोलांटउड्या मारणे क्षम्य केले गेले आहे. पण वास्तविकता अशी आहे, की दोन-अडीच हजार वर्षांपासून प्राकृत/मराठी रूपात या भाषा अस्तित्वात असून त्यांच्यात विपुल शब्दभांडार आहे. तसेच या भाषेत द्राविडी भाषेतून केलेली उसनवारीही भरपूर आहे. तरीही दुर्दैवाने मराठीला संस्कृतचा सासुरवास सोसावा लागतो आहे. त्याचा परिणाम असा झाला, की तिची स्वतःची मोडी लिपीसुद्धा नामशेष झालेली आहे. या संस्कृत भाषावर्चस्वाच्या राजकारणात आधुनिक काळातील भाषापंडितही सामील आहेत, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. "मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांचे पूर्वज आधी द्राविडी किंवा मुंडा भाषा बोलत असले, तरी मराठी ही संस्कृतोद्‌भवच म्हटली पाहिजे." इति : ना. गो. कालेलकर (पाहा : 'भाषा : इतिहास आणि भूगोल, पृ. २७)

**लोकभाषा-बोली-प्रमाणभाषा :**

कित्येकदा बोलीभाषेचा उल्लेख 'लोकभाषा' म्हणून केला जातो आहे, हे लक्षात येतं. वास्तविक 'लोकभाषा' हा शब्दच अतिव्याप्त आहे. लोक म्हणजे माणसं. अर्थात लोक बोलतात ती भाषा असा स्थूल व अतिव्याप्त अर्थ गृहीत धरण्यात येतो. वास्तविक जगात हजारो भाषा, बोली व त्यांच्यां उपबोली लोक बोलत असतात. त्या सर्वांची एकच भाषा असत नाही; म्हणून त्यांना लोकभाषा संबोधता येत नाही. डॉ. हरिश्चंद्र बोरकर म्हणतात, "वास्तविक लोकभाषा या अर्थाचा शब्दच कोशात नाही. आणि आताशा तर 'बोली' असा शब्दच नव्हे, तर सरळसरळ 'भाषा' असाच शब्दप्रयोग केला जातो."

बोलीमध्ये परिसरीय सांस्कृतिक संचिताचे जतन करण्याचे सामर्थ्य असते, तर दुसऱ्या बाजूने ती एकेका मर्यादित प्रादेशिक विभागाचीच व्यवहारभाषा असते. बोलीच्या विनिमयामुळे सामाजिक व्यवहारात तिच्यात टवटवी व जोम हे उत्तम गुण निर्माण होतात, तर दुसरीकडे तिला क्षेत्रीय मर्यादाही पडतात.

महाराष्ट्रात वऱ्हाडी, नागपुरी, खानदेशी, कोकणी, मराठवाडी, झाडी, डांगी अशा काही ठळक बोली आहेत; तर कथोडी, वारली, वाडवळ, फुरसी, सामवेदी, कतिया, हळबी, भुंजिया, नाहरी, कमारी अशा कितीतरी विस्कळीत व विशिष्ट समाजात बोलणाऱ्या बोली महाराष्ट्रात बोलल्या जातात. यांव्यतिरिक्त पुण्याच्या चित्पावन ब्राह्मणांची, सातारच्या मराठ्यांची, सावंतवाडीच्या सारस्वतांची, महाडच्या प्रभूंची, गोव्याच्या ख्रिश्चनांची, वसईच्या गवळ्यांची, माहीमच्या खाडीतील कोळ्यांची भाषा अशा काही वेगवेगळ्या धाटणीच्या भाषा आणि वेगवेगळ्या

लकबी-हेल-सांस्कृतिक संदर्भ अंगीकृत करणाऱ्या बोली आहेत. गावकुसात बोलली जाणारी महारी भाषा आहे, जी आता महारांत उच्चशिक्षण, सांस्कृतीकरण आणि जागतिकीकरणाच्या रेट्यामुळे नष्ट होत असल्याचे दिसते आहे. त्याचप्रमाणे यादवकालीन मराठी, उपरा-उचल्यातून येणारी कैकाडी-भटक्यांची भाषा, हमीद दलवाईंच्या 'इंधन' या कादंबरीतून येणारी मुस्लीम मराठी भाषा, प्रा. शंकर सखाराम यांच्या समुद्रकिनारी मीठ गोळा करणाऱ्या 'आगारातील माणसं' मधील भाषा इ. कितीतरी बोलीभाषेची रूपे दाखविता येतील. आणि दर बारा कोसांवर भाषा बदलत जाते, हे वास्तवही नाकारता येत नाही.

हे सर्व खरे असले व त्यात मोठ्या प्रमाणात विविधताही असली, तरी बोलीच्या संवर्धनातूनच सांस्कृतिक संवर्धनाचा मार्ग प्रशस्त होत जाईल. वर्धा येथे १९६९ मध्ये झालेल्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना मा. पु. शि. रेगे म्हणाले होते, "ज्या भूमीत लेखक जन्माला येतो, तेथील सांस्कृतिक संचित तो लेखक जिवंत करीत असतो.' परंतु ते बोलीबद्दल मात्र काहीच बोलले नाहीत. बोलींच्या ऱ्हासाबरोबर तेथील निसर्गठेवाही (खनिजं, झाडं, वनस्पती, पहाड, नद्या, औषधी इ. संबंधीचे ज्ञान) नष्ट होत जातो.

एखाद्या भाषेतील बोली आणि प्रमाणभाषा समजून घेण्याच्या दृष्टीने अभ्यास केला, तर असं दिसून येतं की, एखाद्या भाषेतील बोली ही त्याच भाषेतील दुसरी बोली बोलणाऱ्याला समजून येत नाही. म्हणजे वऱ्हाडी बोलणाऱ्याला कोकणी बोली समजून येत नाही. आणि कोकणी बोलणाऱ्याला अहिराणी बोली समजून येत नाही. प्रत्येक भाषेतील बोलीमधील हेल-लकबी-शब्दसंग्रह, विशिष्ट प्रादेशिक सांस्कृतिक संदर्भ यांमुळे हे घडत असतं. परंतु प्रमाण भाषा ही प्रत्येकच बोली बोलणाऱ्यांना समजत असते. परंतु मराठीवरील संस्कृतधार्जिण्या मराठीचे जोखड नाकारण्यासाठी सर्वांना समजेल, समांतर असेल, ज्यात बहुजनांच्या व सर्व बोलीभाषिकांच्या सांस्कृतिक संवर्धनाचे संदर्भ असतील, अशी एक भाषा घडविणे आवश्यक आहे.

समाजमन एखादी भाषा ही स्वेच्छेने स्वीकारीत असते हे जरी खरे असले, तरी त्या त्या राज्याने सरकारी-राजकीय व्यवहारासाठी, अध्ययन अध्यापनासाठी जी भाषारूपे स्वीकारली आहेत, त्यांच्या सामाजिक स्वीकारामुळेदेखील भाषेच्या स्वरूपात आमूलाग्र बदल घडून आलेले दिसतात. भाषेवरील आक्रमण आणि भाषेतील प्रदूषण रोखण्यासाठी जाणीवपूर्वक व नियोजनबद्ध रीतीने प्रयत्न करण्याची गरज असते. मोगलांच्या काळात मराठीवर फार्सीचे प्रचंड आक्रमण झाले होते. मुसलमानी सत्तेबरोबर फार्सी भाषा ही राजभाषाच झाली नव्हती, तर लोकजीवनातही शिरली होती. 'राजव्यवहारकोश'-सारखे उपक्रम करून श्री शिवछत्रपती महाराजांनी फार्सीचे आक्रमण मोडून काढले. या संदर्भात एक प्रमाण डॉ. र. बा. मंचरकरांनी दिले आहे. "शिवरायांच्या जन्मापूर्वी राजकीय पत्रव्यवहारात दर शंभर शब्दांमध्ये शहाऐंशी फार्सी शब्द असत, तर अवघे चौदा शब्द मराठी असत. हे प्रमाण १६२८ चे आहे. शिवराज्याभिषेकानंतर म्हणजे १६७७ मध्ये हे प्रमाण दर शंभर शब्दामागे अडतीस फार्सी, बासष्ट मराठी शब्द असे झाले. इ.स.१७२८ मध्ये दर शंभर शब्दांत सात फार्सी शब्द आणि त्र्याण्णव मराठी शब्द असे प्रमाण दिसते. यावरून शिवाजीराजांच्या प्रयत्नांना कसे व किती यश आले, हे स्पष्ट होते." [८]

प्रमाण भाषेला मान्यता असण्याचा अर्थ भाषाव्यवहारात एकविधता आणणे होय. म्हणून प्रमाण भाषा ही एखादी विशिष्ट भाषा नसते, तर जीवनव्यवहारासाठीची सोय आणि गरज या दृष्टीने एखाद्या बोलीलाच प्रमाणभाषेचे रूप दिले जाते.

**भाषासमृद्धीचे काही प्रयत्न :**

भाषा ही एक मानवनिर्मित सामाजिक संस्था आहे. भाषेची निर्मिती हा मानवाने लावलेला एक मोठा शोध म्हणावा लागेल. तिची सर्वसमावेशकता, सांस्कृतिक संदर्भांचे जतन व संवर्धनक्षमता ही आजच्या उदारीकरणाच्या, जागतिकीकरणाच्या काळातील एक महत्त्वाची गरज आहे. मराठी भाषेच्या संदर्भात जर विचार केला, तर असे फारच थोडे प्रयत्न झालेले दिसतात.

डॉ. डोळके यांनी नागपुरी बोलीचा अभ्यास मांडला.

वर्ध्याचे दे. ग. सोटे यांनी वऱ्हाडी भाषेचा शब्दकोश तयार केला. डॉ. सुभाष सावरकरांचा 'जन्मभाषेच्या शोधात' हा ग्रंथ भाषा–इतिहासाला नवी दिशा देणारा चिंतनग्रंथ आहे. त्यापूर्वी श. गो. तळपुदे यांनी 'यादवकालीन मराठी'चा घेतलेला शोध हे महत्त्वाचे कार्य म्हणावे लागेल. ह्यानंतर विद्यापीठात प्राध्यापक नसतानादेखील डॉ. हरिश्चंद्र बोरकरांनी 'बोलीचे भाषावैज्ञानिक अध्ययन' हे संशोधन विद्यापीठाला सादर करून 'आचार्य' पदवी मिळविली. ते एवढ्यावरच थांबले नाहीत, तर त्यांनी तो प्रबंध 'झाडीबोली : भाषा आणि अभ्यास' (३५० पेजेस) प्रकाशितही केला. तेव्हापासून झाडीबोलीच्या अभ्यासाला चालना मिळाली असल्याचे दिसून येते. झाडीबोलीच्या संवर्धनाची ही चळवळ सुमारे २० वर्षांपूर्वीची आहे. 'बोली वाचवा–मराठी वाचवा' हे या चळवळीचे घोषवाक्य आहे. डॉ. सुभाष सावरकर व इतर पूर्वसूरींच्या काही भाषासंशोधकांप्रमाणे डॉ. हरिश्चंद्र बोरकरही बोलींनाच संस्कृतची जननी मानतात. भाषेच्या चिंतनासंबंधी त्यांचे 'भाषिक भ्रमंती' हे पुस्तक वाचण्यासारखे आहे. ६२ व्या विदर्भ साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना डॉ. किशोर सानप म्हणतात, 'बोलींची लिपी तयार व्हावी'. डॉ. हरिश्चंद्र बोरकर म्हणतात, एखाद्या भाषेला तिची स्वतःची लिपी नसल्यामुळे त्या भाषेच्या भाषासत्त्वाला कोणतंच उणेपण प्राप्त होत नाही. आपल्या अध्यक्षीय भाषणातून डॉ. किशोर सानप म्हणतात. "झाडीबोलीची चळवळ आणि बोलीभाषा महामंडळाची चळवळ महाराष्ट्रव्यापी करण्याचं श्रेय हरिश्चंद्र बोरकर, हिरामन लांजे, सुभाष चांदुरकर, ना. गो. थुटे आणि त्यांच्या सहकारी साहित्यिक मंडळीला दिलं पाहिजे. ह्या मंडळीनं झाडीबोली साहित्य चळवळीचं तत्त्वज्ञान मांडलं. झाडीबोलीचा शब्दकोशही सिद्ध केला. भाषिक आणि वाङ्मयीन अस्मिताही जपली. झाडीबोली साहित्य संमेलनं आणि नाट्यप्रयोग करून झाडीबोली साहित्याचं स्वतंत्र दालन समृद्ध केलं."[८]

डॉ. बोरकरांनी झाडीबोलीच्या शब्दकोशात १२ हजार शब्दांचे संकलन केले आहे. मराठीतील आद्यकवी मुकुंदराज हे भंडारा जिल्ह्यातील अंभोरा परिसरातील. विवेकसिंधु व इतर संतकवींच्या साहित्यात सुमारे आठ हजार शब्द हे झाडीबोलीतले आहेत, असं त्यांना आढळून आलं आहे. प्रा. शंकर सखाराम यांच्या 'शब्दानुबंध' हा लोकसाहित्यावरील आस्वादपर ग्रंथ आणि हळूहळू आधुनिक संस्कृतीतून हद्दपार होत चाललेल्या वस्तूंचा, त्यांच्या सांस्कृतिक इतिहासासह तयार केलेला 'वस्तुकोश' हे भाषा आणि संस्कृतीच्या संरक्षणाच्या संदर्भात महत्त्वपूर्ण प्रयत्न म्हणावे लागतील.

मराठीच्या ज्या बोली उपबोली आणि काही समाजगट व वर्गाच्या ज्या भाषा आहेत, त्या सर्वांचे संकलन करून त्यांचा सांस्कृतिक इतिहास नव्याने मांडण्याची गरज आहे. त्यातून मराठी भाषेचं एक प्रगल्भ रूप तयार होऊन मराठी भाषा अधिक समृद्ध रूपात उभी होईल.

इंग्रजांनी ज्या ज्या ठिकाणी आपल्या वसाहती उभ्या केल्या, त्यांतील भाषिक देवाणघेवाणीतून त्यांनी आपली भाषा प्रगल्भ केली. व्यापक केली. आज इंग्रजी शब्दकोशात आठ लाख शब्द आहेत. त्या तुलनेत दहा कोटींच्यावर मराठी भाषिकांच्या मराठी शब्दकोशात केवळ सव्वा लाख मराठी शब्द आहेत. कोशातील ही शब्दांची तफावत विचार करण्यासारखी आहे.

महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेरील जे मराठीभाषिक आहेत, त्यांच्या बोली-उपबोलींचे संकलन करून त्यातील –शब्द, प्रतिमा, प्रतीके, पारिभाषिक शब्द, विशिष्ट संकेत देणारे शब्द, प्रादेशिक व त्या त्या प्रादेशिक परिसरातील सांस्कृतिक संदर्भ आत्मसात करणारे शब्द, नाम–सर्वनाम –विशेषनाम–विभक्तिरूपे, वाक्यरूपे इ. च्या संदर्भात प्रत्येक बोलीनुसार होत जाणारे बदल व त्यांतील एकात्मरूपे इ. संदर्भात अभ्यासपूर्ण मांडणी करणे गरजेचे आहे. हा प्रयत्न सामूहिक व व्यापक स्वरूपात करून त्यातून शब्दकोश, संस्कृतिकोश व व्याकरण तयार होणे गरजेचे आहे. सरकारी पातळीवर जर हे काम होत असेल, तर त्याला गती देणे गरजेचे आहे. आंतरिक कलह, अहंकार, वर्गीय जाणिवा व जातिपातीचे राजकारण बाजूला सारून जे भाषेचे अभ्यासक आहेत, जे आत्मीयतेनं, उत्स्फूर्ततेनं, जनकळवळ्यानं भाषाचिंतन मांडू शकतात, अशा मंडळींना त्यात समाविष्ट करून घेणं गरजेचं आहे.

भाषाशास्त्रीय अभ्यासाच्या संदर्भात विद्यापीठीय








पातळीवरदेखील शुकशुकाटच दिसतो. लोकसाहित्या-वरील संशोधनातून लोकसंस्कृती आणि भाषा या संदर्भात काही काम झालं असलं, तरी प्रबंधांच्या प्रकाशनातून त्याचा प्रचार-प्रसार व जाणिवनिर्मिती झाली पाहिजे. सेवाज्येष्ठतेच्या पायऱ्या चढतचढत उच्चपदावर गेलेल्या प्राध्यापकमंडळींची भाषेच्या संदर्भातील ज्ञानपातळी ही काही मान्यवर अपवाद वगळले, तर सामान्य दिसून आली आहे. या सेवायोजनेतून मग ते 'आचार्य' पदवीचे मार्गदर्शकही बनून जातात. मग भाषाशास्त्रासारख्या विषयासाठीही ते मार्गदर्शक बनून जातात; परंतु त्यांनी त्या विषयाच्या क्षेत्रात खरोखरच किती मौलिक कार्य केले आहे, त्यांची त्या विषयावर किती पकड आहे, हे बघितले जात नाही. त्यामुळे त्यातून त्या क्षेत्रात काय उजेड पडेल, हे समजून घेण्यासारखे आहे.

इंग्रजी भाषेत मोठ्या प्रमाणावर भाषाचिंतन झाले आहे-होत आहे; परंतु मराठीच्या प्राध्यापकांचे इंग्रजीबद्दलचे अज्ञान व अनास्था यातून हे काम पुढे सरकण्याच्या संदर्भात अडचणी उभ्या राहत आहेत. विद्यापीठ आणि साहित्य संमेलनांची व्यासपीठे यांवर भाषेच्या संदर्भात चिंतन-चर्चा करणारे परिसंवाद फारच कमी प्रमाणात आयोजित केले जातात. झालेच तर त्यांत भाषाशास्त्र शिकविणारे किंवा भाषेचा अभ्यास जोपासणारे किती असतात?

वरील भाषाचिंतनातून व त्यासाठी कराव्या लागणाऱ्या प्रयत्नांतून मराठीवर लादण्यात आलेलं पुणेरी मराठीचं संस्कृतधार्जिणं जोखड नाकारता येईल. आणि मग सर्वांना समजेल, सर्वांना समांतर असेल, ऐंशी टक्के ग्रामीण बहुजनांच्या, अनुसूचित जाती-जमातींच्या लोकांच्या व नागरी जनतेच्या सांस्कृतिक संवर्धनाचे संरक्षण केलेले असेल, अशी एक सर्वसमावेशक मराठी भाषा घडविणे शक्य होईल. अशी भाषा घडविणे शक्य आहे काय, याचा थोडा विचार करू या.

**सर्व मराठी भाषिकांची भाषा : 'जनभाषा'**

१९८४ पासून मराठी जनसाहित्य परिषद, अमरावतीने जनसाहित्याची संकल्पना पुढे आणण्यासाठी 'अक्षर वैदर्भी' या मासिकाच्या माध्यमातून गेली २८ वर्षे जनसाहित्याची तात्त्विक मांडणी, जनसाहित्याची उपयोजित समीक्षा, जनसाहित्याचे सौंदर्यशास्त्र इ. संदर्भात चिंतन व चर्चा करून 'जनसाहित्य' विचाराची अथवा 'जननिष्ठ' चिंतनाची बांधणी केली. त्यातून 'जनभाषेचे' सामर्थ्य व स्वरूप कसे असावे, यासंबंधीही चिंतन मांडणे गरजेचे ठरते. डॉ. सुभाष सावरकरांनी २००५मध्ये 'जनभाषेच्या शोधात' या छोटेखानी ग्रंथात जनभाषेच्या संदर्भात मौलिक चिंतन सादर केले आहे. पुढे भाषा विभागात या ग्रंथाला महाराष्ट्र राज्य शासनाचा पुरस्कारही मिळाला. 'जनभाषेचे' चिंतन समजून घेण्यासाठी जनसाहित्यातील 'जन' ही संकल्पना समजून घेणे गरजेचे आहे. जनसाहित्याच्या संदर्भात प्रा. या. वा. वडरकर आणि सुभाष सावरकर यांनी मौलिक कार्य केले असून डॉ. सुभाष सावरकरांनी या संकल्पनेला अधिक विधायक अधिष्ठान प्राप्त करून दिले आहे, हे नमूद केले पाहिजे.

जनसाहित्यातील 'जन' म्हणजे निरुपाधिक मानवी सत्त्व होय. 'माणसातली माणुसकी जागविणारे साहित्य म्हणजे जनसाहित्य', अशी सर्वांना चटकन समजणारी एक व्याख्या डॉ. सावरकरांनी 'जनभाषेच्या शोधात' या पुस्तकात (पृ.६) केली आहे. "जनसाहित्यातील 'जन' म्हणजे-देश, काल, धर्म, पंथ, वर्ग, जात, लिंग, प्रदेश इ. भेदमूलक उपाधींच्या पलीकडील निखळ माणूस असून, 'जनतत्त्व' म्हणजे माणूसपण (मानवी सत्त्व) होय. व्यापक जनतत्त्वावर निष्ठा ठेवणे म्हणजे जननिष्ठा होय"[९] तसेच डॉ. द. भि. कुलकर्णी यांच्या मते, " 'जन'-समूहाचा अर्थ झुंड नव्हे, जमाव नव्हे किंवा एकाकी गर्दीही नव्हे, तर सगळ्या बाह्य उपाधींच्या पलीकडच्या मानवसमाजाच्या मानवी सत्त्वाचा तो अर्थ होय."[१०]

वरील काहीशा स्थूल विवेचनावरून जनसाहित्याचे स्वरूप व भूमिका लक्षात आली असेल. मग मराठी जनसाहित्याच्या संदर्भात सर्व मराठी जनांना एकाच वेळी आवाहन करू शकेल, अशी 'जनभाषा' कशी असावी; ती प्रमाणभाषा असावी, की लोकभाषा म्हणून संबोधली गेलेली बोलीभाषा असावी..... बोलीभाषा ही जनभाषा असावी असे म्हटले, तर ती एकेका प्रादेशिक विभागाची व्यवहारभाषा असते. बोलीतील जिवंत विनिमयामुळे तिच्यात टवटवी व जोम हे उत्तम गुण जरी असले, तरी तिला क्षेत्रीय मर्यादा पडलेली असते. बोलीभाषा या






## मराठी 'जनभाषा' : स्वरूप आणि दिशा



वस्तुनिष्ठता, निश्चितार्थता, नियमितता या गुणांच्या अभावी शास्त्रपातळीवर उभ्या राहण्यासाठी अपुऱ्या ठरतात. याचाच अर्थ मराठीतील बोली या पोटभाषा या सर्व मराठी भाषिकांना आवाहन करू शकतील, एवढ्या आवाक्याच्या नाहीत. बोलीभाषा या राज्यपातळीवरील प्रशासन, अध्ययन-अध्यापन, न्याय, आरोग्य, कायदा, ज्ञानभाषा इ. संस्थांच्या व्यवहारासाठी पुरेशा उपयोगी नाहीत. आणि आज जी पर्याप्त मानली गेली आहे, ती प्रस्थापित प्रमाण मराठी भाषा- तिचा ७०-८० टक्के मराठी समाजाशी जवळिकीचा संबंध नाही. "मातृभाषेतून विद्याग्रहण वा साहित्यनिर्मिती केल्याशिवाय अस्सल ज्ञानार्जन वा जाणीवसंप्रेषण होणे शक्य नाही (अस्सल ज्ञानार्जनाच्या अभावी) आणि शास्त्रभाषेसाठी बोलीभाषा उपयोगी नाही-अशा परिस्थितीत गेल्या पाऊणशे वर्षांत मराठी साहित्य-संस्कृती खुरटून गेल्याचे प्रत्ययास येते आहे."[११]

आणि म्हणून मग जनभाषा-जनसाहित्याची भाषा ही प्रस्थापित प्रमाणभाषा असावी काय, याही प्रश्नाला नकारात्मकच उत्तर द्यावे लागेल. दादोबा पांडुरंग यांनी सदाशिवपेठी मराठी बोलीचे संस्कृतच्या वळणावर व्याकरण रचून ती पुरती संस्कृतधार्जिणी करून टाकली आहे. त्यामुळे अशा घल्लेदार व क्लिष्ट भाषेतून साहित्य-निर्मिती जरी शक्य असली, तरी त्याच वेळी ती निर्जीवही होत जाते, हे खरे आहे. त्यामुळे साहित्यनिर्मिती अर्थात अनुभवसंप्रेषणाच्या बाबतीत तिचे अंगीभूत सामर्थ्य कमी पडते. ही प्रमाण भाषा पुण्याच्या बोलीतून घडविली गेली असल्यामुळे वऱ्हाड, खानदेश, मराठवाडा, कोकण इ. प्रादेशिकांना ती एक परकीय भाषाच वाटते. त्यामुळे प्रमाणभाषेच्या नावाखाली पुणेरी पेशवाईचे मायावी पाश आमच्या गळ्याभोवती आवळविले जात असतील, तर आम्ही ही भाषा का स्वीकारावी? अशा प्रकारे ही प्रमाणभाषा लादण्याच्या धोरणामुळे, ग्रामीण भागातील बहुतेक मुलं मराठीतच नापास होतात. 'आम्हाला शुद्ध बोलता येत नाही', हा न्यूनगंडही याच भाषेने ग्रामीणांना दिला आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे आम्ही आमच्या भाषेची 'मोडी' ही लिपीच गमावून बसलो आहोत. हाही याच संस्कृतधार्जिण्या प्रमाण मराठीचा प्रताप नव्हे काय?

संस्कृतच्या प्रभावातून देवभाषा, देवनागरी, व्यासपीठ इ. शब्द मराठीत रूढ झालेले आहेत. वास्तविक आतापर्यंतच्या सांस्कृतिक इतिहासात भाषा ही देवाने निर्माण केली आहे, याचे कोणतेच पुरावे नाहीत. भाषा ही अखिल मानवीय समाजाची सांस्कृतिक व सामाजिक उपज आहे. वर उदाहरणादाखल दिलेल्या काही शब्दांऐवजी -भाषा, नागरी, विचारपीठ असे शब्द जर वापरले, तर संस्कृतचे व संस्कृतच्या संस्कृतीचे जोखड झुगारल्यासारखे होईल.

संस्कृतमधील उपासनामार्ग, ज्ञान हे जन-सामान्यांपर्यंत पोचू नये म्हणून देवभाषा म्हणवली गेलेली ही भाषा काळोकुलपात बंदिस्त करून ठेवण्यात आली. हे ज्ञान फक्त एका विशिष्ट समाजासाठीच होते, ते स्वार्थी होते व विषमतादर्शक होते. ते शूद्र-अतिशूद्र -स्त्रियांपर्यंत पोचू नये यासाठी त्यांनी शास्त्रात लिखित व अलिखित स्वरूपात काही संकेत निर्माण करून ठेवले होते. ते असे-"एखादा शूद्र जर स्वेच्छेने वेदमंत्रांचा घोष ऐकत राहील, तर कथिल व लाख यांचे तापविलेले रस त्याच्या कानात ओतावेत; तो वेद वाचू लागला, तर त्याची जीभ कापून टाकावी; वेद जर त्याला मुखोद्गत झाले असतील, तर त्याला मधोमध उभे चिरून काढावे."[१२] (गौतम धर्मसूत्र, अध्याय २०, सूत्रे ४-५.)

याविरुद्ध पहिला उठाव विज्ञाननिष्ठ लोकायतांनी केल्याचे दिसून येते. पुढे भगवान महावीर व मध्यममार्गी विज्ञाननिष्ठ महात्मा बुद्धानेही संस्कृतचे जोखड झुगारून मागधी-पाली/प्राकृत भाषेला धर्मभाषेचा दर्जा दिला. त्यानंतर नाथसंप्रदायाने-गोरक्षकांनी भारतभर फिरून जनप्रबोधनासाठी त्या त्या प्रदेशाची भाषा वापरली. पुढे १२ व्या व १३ व्या शतकांत चक्रधरांनी मराठी-वऱ्हाडीलाच धर्मभाषा बनविले. ज्ञानेश्वरांची 'भावार्थदीपिका' वगळता-हरिपाठ, अभंग, गवळणी इ. रचना मात्र जनआकलनसुलभ उतरली आहे. नामदेव, जनाबाई, गोरोबा, सावतोबा, नरहरी सोनार, चोखामेळा, सोयिरा इ. समकालीनांनी मराठमोळ्या शैलीतील रचनेमधूनच लोकसंवाद साधला. वारकरी संप्रदायातील संतमंडळींनी ना कधी बोलीचा आग्रह धरला ना संस्कृतचे

लांगूलचालन केले ना प्रमाण भाषेच्या अभिव्यक्तीसाठी ते अडून बसले. महाराष्ट्रातील, मराठी भाषिक प्रदेशातील, सर्व बोली भाषिक संतांनी जी भाषा समाजप्रबोधनासाठी वापरली, ती प्रमाण भाषा व प्रादेशिक बोली यांचे एक नितांतसुंदर असे एक रूप आहे. ती संतवाणी व म.फुले आदी जननायकांची भाषा मराठी भाषिकांना आजवर समजत आली आहे; हा खरा भाषिक इतिहास आहे. अलीकडे बहिणाबाई चौधरींची गाणी समजत नाहीत, असा कुणी थोर पुरुष दाखविता येणार नाही.

— इथेच आपल्याला जनभाषेचे स्वरूप कसे आकार घेते व त्यातून कसा जनसंवाद साधला जातो, हे लक्षात येईल. यावरून एक निष्कर्ष काढता येतो, की ज्याला मराठी म्हणता येईल अशी 'जनभाषा' काळाच्या ओघात गेल्या सात-आठशे वर्षांत आपोआपच घडत गेलेली आहे. शिवकाळात व पेशवाईत शाहिरांच्या लावण्या–पोवाडे–कटावांची भाषा ही जनभाषाच होती. सावित्रीबाई –महात्मा फुल्यांची जनप्रबोधनाची भाषादेखील जनभाषाच होती. आधुनिक काळात तुकडोजीमहाराजांच्या साहित्य भाषणांची व गाडगेमहाराजांच्या भजन-कीर्तनांची भाषाही जनभाषाच होती. आधुनिक भारतातील हे दोन्ही संत महाराष्ट्र– महाराष्ट्राबाहेर परप्रांतांत–परदेशात जनप्रबोधनासाठी जनसंपर्क करीत फिरले, पण त्यांना भाषेचा प्रश्न कधीच पडला नाही. त्यातल्या त्यात हे दोन्ही संत रूढ अर्थानं अल्पशिक्षित व अशिक्षित होते, हे विशेष!

वरील चिंतनातून जनभाषेच्या स्वरूपाची व त्यासाठी कराव्या लागणाऱ्या प्रयत्नांची अल्पशी कल्पना आली असेल; ती पुरेशी नाही, याची मला जाणीव आहे. ज्यांची मातृभाषा मराठी आहे अशांसाठी सर्वांना समांतर असेल व ज्यात सर्वांच्या सांस्कृतिक संचितांचे प्रतिबिंब असेल अशी एक आणि एकच जनभाषा असणे गरजेचे आहे. त्यातून मराठी भाषिकांची साहित्य आणि संस्कृतीची परंपरा एकात्मिकपणे आविष्कृत होऊ शकेल; परंतु त्यासाठी भाषेसंबंधी आपल्या काही पारंपरिक धारणा असतील, काही पूर्वग्रह असतील, तर त्यांचा पुनर्विचार करणे गरजेचे आहे. "जनभाषेऐवजी बोलीचा किंवा संस्कृतप्रचुर प्रमाण मराठीचा आग्रह धरणारे हे स्वतःला एकेका मर्यादित समाजगटापुरतेच बंदिस्त करून ठेवत असतात. जनभाषेसारखे त्याचे आवाहन सार्वत्रिक ठरू शकत नाही. अर्थात त्यात खरा भेद आहे तो वृत्तीचाच. संस्कृत किंवा संस्कृतप्रचुर मराठी हा अभिजन गौरवाचा विषय बनवून ठेवावा; परिणामी तो जनसामान्यांच्या आकलनापलीकडेच राहावा, असे उच्चभ्रूंचे भाषिक राजकारण असते. जनसाहित्यकारांची वृत्ती नेमकी याविरुद्ध असते."[१३] जनसाहित्याची भाषा नेमकी कशी असावी याबद्दल ते म्हणतात, "(१) सर्वजनसंबोधी असावी–अर्थात मराठी मातृभाषा असणाऱ्या बहुसंख्याक जनतेला ती सहज समजावी.(२) मानवनिष्ठा, इतिहास व परंपरानिष्ठा यांची जाणीव तिचा शब्द/वाक्य प्रयोगरूपातून व्हावी."[१४]

**वं. राष्ट्रसंत तुकडोजीमहाराज आणि 'जनभाषा'**

सर्वांना एकात्मतेचे आवाहन करणाऱ्या जन-साहित्याची 'जनभाषा' नेमकी कशी असावी, याचं उत्तर स्वतः वं. राष्ट्रसंत तुकडोजीमहाराजांनीच एका प्रसंगात दिलं आहे. तेव्हाच्या उत्स्फूर्त हिन्दी भाषण– भजनांतून राष्ट्रसंतांनी 'जीवनका साहित्य' असा शब्दप्रयोग केला आहे. केवळ कलेसाठी कला नव्हे, तर जीवनासाठी कला या विचाराला प्राधान्य देऊन जीवन जगण्यासाठी जी जी कला सहकार्य करते, ती सर्व जीवनकला (जीवनसाहित्य), असं सूत्र ते अधोरेखित करतात. एके ठिकाणी ते म्हणतात, 'मी कुंभाराच्या मडक्यातही साहित्य पाहतो.'

तो प्रसंग असा– तीर्थराज प्रयागच्या कुंभमेळ्यात त्रिवेणीसंगमावर २२ ते २४ जानेवारी १९६६ या दरम्यान विश्वहिन्दू परिषदेचे जे महासंमेलन झाले, त्यात भारतातले सर्व धर्ममार्तंड तसेच देशोदेशीचे श्रेष्ठ धर्मप्रवक्ते हजर होते. या संमेलनाचे उद्घाटन राष्ट्रसंतांनी साध्यासहज शैलीत पण उत्कृष्टपणे केले. त्यांमुळे अहंकार व असूयेने पेटलेले पुरीच्या गोवर्धन पीठाचे शंकराचार्य निरंजनदेव तीर्थस्वामी खवळून म्हणाले– "संस्कृत हमारी वेदवाणी है। क्या तुकडोजी यह जानते हैं?... तुकडोजी कौन से शास्त्र पढे हैं?" त्यावर वं. राष्ट्रसंतांनी आपल्या भजनातून गंभीरपणे उत्तर दिले. त्या भजनातील काही ओळी खालीप्रमाणे–

- वेदशास्त्र तुम पढे हो पर, यह जनभाषा नहि जानोगे?

- उसके बिन नहि समाज सुधरे, क्या कहना यह मानोगे?

- हो उँचे पंडित और, साहित्यरत्न विद्वान बडे
जबतक कद्र नही गरिबोंकी, है तबतक सुनसान पडे।।

**संदर्भसूची :**


१) डॉ. भालचंद्र नेमाडे, 'साहित्य, संस्कृती आणि जागतिकीकरण, लोकवाङ्मयगृह मुंबई, मार्च-२००३,पृ. १८.

२) प्रा. रंगनाथ पठारे, 'जागतिकीकरण आणि देशीवाद', लोकवाङ्मयगृह, मुंबई, २००३, पृ. ९.

३) डॉ. सुभाष सावरकर, 'जनभाषेच्या शोधात', मराठी जनसाहित्य परिषद, अमरावती, २००५ पृ. ४१.

४) तत्रैव, पृ. ४१-४२.

५) तत्रैव, पृ. ४२.

६) तत्रैव, पृ. ८.

७) रत्नाकर बापूराव मंचरकर, 'वृथा ही बढाओी सुकार्याविणे', अनुष्टुभ, जा. के. २००२, पृ. १२.

८) डॉ. किशोर सानप, अध्यक्षीय भाषण, ६२ वे विदर्भ साहित्य संमेलन, गोंदिया, दि. ७/८ डि. २०१२, प्रका. शोभा उबगडे, सीताबर्डी, नागपूर, पृ. १६.

९) डॉ. नीलकंठ गोपाळ मेंढे, 'जनसाहित्य : चिंतन आणि चिकित्सा', मराठी जनसाहित्य परिषद, अमरावती, पृ. ३०.

१०) तत्रैव, पृ. ३१५.

११) डॉ. सुभाष सावरकर, उनि. पृ. ३.

१२) गजमल माळी, वैदिक धर्मविचार आणि सामाजिक गुलामगिरी, लेखांक ३ रा, सा. राजकीय सत्तांतर औरंगाबाद, २९ ऑगस्ट १९९९, राजमुद्रा ऑफसेट, पृष्ठ ४.

१३) डॉ. सुभाष सावरकर, उनि. पृ. १५.

१४) डॉ. सुभाष सावरकर, उनि. पृ. २९-३०.















# भाषेसाठी ज्ञानाचाच बळी द्यायचा का?

रमेश पानसे

शिक्षणविषयक सारे निर्णय अलीकडे सरकार घेत असते आणि ते सर्व समाजाला कायद्याने अथवा बळजबरीने स्वीकारायला भाग पाडत असते. त्याने अनेक अडचणी उद्‌भवतात. कारण जेव्हा शासन शिक्षणाचे निर्णय घेते, तेव्हा त्याच्यावर सार्वत्रिकतेच्या व दीर्घकालीनतेच्या अशा दोन विचारांचे ओझे असते. सार्वत्रिकता म्हणजे जो निर्णय घ्यायचा तो सर्वांना समानतेने लागू केला पाहिजे, अशा विचाराचे असलेले बंधन व दीर्घकालीनता म्हणजे आपण घेतलेला निर्णय हा कायम स्वरूपात टिकणारा असला पाहिजे अथवा असतो, असे मानण्याच्या विचाराचे असलेले बंधन. सरकारातील निर्णयकर्ती माणसे या दोन बंधनांत अडकलेली असतात. त्यांच्या या मर्यादा असतात. त्यामुळे, त्यांना एकदम वेगळा 'जरा हटके' विचार करणे दुरापास्त असते. साहजिकच त्यांच्या विचारांची पठडी बनते आणि पठडीबद्ध विचार नेहमीच प्रश्न सोडविण्यासाठी अडथळा करतो. याचा प्रत्यय आपल्याला मराठी शाळांतून पहिलीपासून इंग्रजी शिकविण्याच्या निर्णयाबाबत आला.

हा निर्णय मोठा होता; पण तो सरकारी पठडीत सुरुवातीपासूनच अडकलेला होता. सरकारला मुलांना काही नवे शिकवावे असे वाटले, की लगेच दोन पठडीबद्ध गोष्टी अवलंबल्या जातात. एक म्हणजे, जे काही नवे शिक्षणात आणायचे त्याचे लगेच एका 'शालेय विषया'त रूपांतर करायचे. म्हणजे एक नवा विषय शिक्षणात आणायचा. तसा इंग्रजी हा 'विषय' पहिलीपासूनच अभ्यासक्रमात आणला गेला. दुसरी गोष्ट अशी, की विषय हा नेहमीच क्रमिक पुस्तकाद्वारे शिकविला पाहिजे, असे पठडीबद्ध सरकारी शिक्षक-कर्मचाऱ्याला वाटते. मग सरकारने अशी मुलांना इंग्रजी शिकण्यासाठीची क्रमिक पुस्तके तयार केली. या साऱ्या खटाटोपातील प्रमुख अडचण अशी आहे, की 'भाषा' हा 'विषय'च असा आहे, की तो क्रमिक पुस्तकात येऊन बसतच नाही. कारण तो क्रमिक पुस्तकात मावतच नाही. फारतर इतके असू शकते, की शिक्षकांसाठी इंग्रजी शिकविण्यासाठी एखादे क्रमिक पुस्तक करता येईल. परंतु मुलांच्या शिकण्यासाठी मात्र खासच नव्हे!

**भाषा आत्मसात करणे**

भाषा आत्मसात करणे ही गोष्ट नेहमीच क्रमिक पुस्तकाशी असंबंधित अशी आहे; ती क्रमिक पुस्तकांच्या बाहेरील वास्तव जगातील क्रिया-प्रतिक्रियांतून घडून येणारी अशी प्रक्रिया आहे. भाषा ही वातावरणात असावी लागते; मग ती, मुले आपल्या भाषा-इंद्रियांनी आत्मसात करू शकतात. क्रमिक पुस्तकातून माहिती जरूर देता येते; पण भाषा आत्मसात करण्यासाठी लागणारे भाषानुभव मात्र कदापिही देता येत नाहीत. शालेय शिक्षकांसाठी एखादे क्रमिक पुस्तक तयार करून, मुलांच्या शिकण्यासाठी (मुलांना 'शिकविण्या'साठी नव्हे!) वातावरणनिर्मिती कशी असावी, कृत्रिम रीत्या ती कशी करावी, भाषानुभव कसकसे द्यावेत, याचे धडे त्यांना देता येतील; द्यावेत. भाषा शिकण्याच्या दोनच पद्धती उपलब्ध आहेत. एक, परिसरातून भाषा आत्मसात करणे आणि दोन, एका भाषेकरवी दुसरी भाषा शिकणे. तिसरा पर्याय उपलब्ध दिसत नाही. संगणकाचा वगैरे वापर करून दुसऱ्या प्रकारच्या भाषाशिक्षणाला काहीसा उपयोग होऊ शकेल; पण, आजतरी तो पहिल्या म्हणजे नैसर्गिक रीत्या भाषा आत्मसात करण्याच्या प्रक्रियेत फारसा उपयोगी नाही. क्रमिक पुस्तकाकरवी भाषा शिकणे हेही दुसऱ्या, म्हणजे एका भाषेकरवी दुसरी भाषा शिकण्याच्या प्रयत्नांना उपयोगी ठरू शकेल; पण तो पहिल्या म्हणजे नैसर्गिक रीत्या भाषा आत्मसात करण्याच्या प्रक्रियेत फारसा उपयोगी नाही. क्रमिक पुस्तकाकरवी भाषा शिकणे हेही दुसऱ्या म्हणजे, एका भाषेकरवी दुसरी भाषा शिकण्याच्या प्रयत्नांना उपयोगी ठरू शकेल; पण तो पहिल्या पद्धतीचा पर्याय होऊ शकत नाही.










भाषा ही, जगात साठलेली माहिती मुलांच्या मेंदूत भरण्याची बाब नाही; तर ते यासाठीचे साधन आहे. श्वास जसा दुसऱ्याला भरवता येत नाही, मूल्ये जशी तथाकथित सुविचारांतून, श्लोक पाठांतरांतून रुजविता येत नाहीत, तशी भाषा हीसुद्धा क्रमिक पुस्तकांतून शिकविता येत नाही. असे का असते, हे 'भाषे'ची वैशिष्ट्ये पाहिल्यास लक्षात येईल.

**भाषेची वैशिष्ट्ये**

मला आढळलेली भाषेची सात वैशिष्ट्ये आहेत (अजूनही कदाचित सापडतील). भाषा हा या सर्व वैशिष्ट्यांनी घडलेला घडा आहे आणि तो ज्याला-त्याला आपला आपणच घडवावा लागतो. परिसराच्या चक्रावरच हा घडा घडत जातो; भाषानुभवांची माती मळूनच तो घडत असतो. एकदा का हा घडा पक्का तयार झाला, की मग त्याच्यातून कुठल्याही विषयाची माहिती भरून घेता येते. इतकेच नव्हे, तर दुसरी कोणतीही भाषा शिकून घेता येते.

भाषेची ही वैशिष्ट्ये येथे क्रमाने सांगितली असली, तरी त्यात प्राधान्य वा क्रमवारिता नाही, हे लक्षात घ्यायला हवे. या सर्वच धाग्यांनी, एकाच वेळी, भाषेचा पोत विणला जातो.




**१. रचनाबद्धता** (Structured)- रचनाबद्धता हे भाषेचे पहिले वैशिष्ट्य आहे. प्रत्येक भाषेचे एक विशिष्ट असे 'रूप' असते. भाषेची ही रचना किंवा संरचना (Structure) ही व्याकरणाच्या पायाभूत घटकांनी तयार झालेली असते. ध्वनी किंवा स्वनिम (Phonemes), अक्षरोच्चार, शब्दोच्चार, शब्द-व्यवस्था व वाक्यव्यवस्था (Syntax) इत्यादी घटकांनी भाषेची संरचना घडलेली असते. स्वतःच्या भाषाशिक्षणात, लहान वयातच मुले ही संरचना पायरीपायरीने आत्मसात करीत जातात.

**२. अर्थात्मकता** (Semantics)- भाषारचनेचा मुख्य उद्देश असतो, तो भाषेतील अर्थस्पष्टतेचा. शब्द आणि वाक्ये हे भाषाघटक काही 'अर्थ' घेऊन येतात. आपण शब्दोच्चार केल्याने किंवा वाक्योच्चार केल्याने त्यातील अर्थ दुसऱ्याला (आणि स्वतःलाही) कळतो. लहान वयात, भाषा आत्मसात करताना मुले शब्दोच्चार व त्यांचा अर्थ यांची सांगड घालत जातात. मुले आपल्या स्मृतीत ठेवीत असलेला शब्दसंग्रह हा अर्थपूर्ण शब्दांचाच असतो.

**३. रचनांतरणता** (Transformation)- एका प्रकारची वाक्यरचना आत्मसात झाली, की मुले स्वतःच्याच क्षमतेने तशाच प्रकारच्या दुसऱ्या वाक्यरचना करू शकतात. शिवाय एका तऱ्हेने, एका परिस्थितीत अवगत केलेली भाषारचना, दुसऱ्या तऱ्हेने, दुसऱ्या परिस्थितीत आवश्यक ते बदल करून वापरू शकतात. मुलांना अशा प्रकारच्या रचनांतरणाच्या संधी, शिक्षक, पालक जाणीवपूर्वक देऊ शकतात.

**४. संदर्भाधीनता** (Referential)- भाषेच्या प्रत्येक वापराला काही ना काही ना संदर्भ असतो. तो व्यक्तींचा, घटनांचा, वस्तूंचा किंवा संकल्पना, कल्पना व विचारांचा असू शकतो; तसाच तो विशिष्ट काळाचाही असू शकतो. संदर्भाने अर्थनिश्चितीकरण तर होतेच; पण त्याचबरोबर गोष्टी स्मृतीत राहायलाही मदत होते.

**५. आंतरव्यक्तिता** (Interpersonal)- भाषेचा बराच व्यावहारिक वापर हा दोन वा अनेक व्यक्तींमधील संवादासाठी असतो. इतरांशी संपर्क, सल्लामसलत, भाषण-संभाषण अशा अनेक गोष्टींसाठी होणारा भाषेचा वापर हा मूलत; व्यक्तिव्यक्तींमधील संवाद साधण्याचाच असतो. यांमधील भाषावापराची विविध वळणे, मुले, इतरांच्या संपर्कात शिकत जातात. या बाबतींतले कित्येक संकेत त्यांच्या अंगवळणी पडतात.

**६.व्यक्तीअंतर्गतता** (Intrapersonal)- भाषेचे 'बाह्य' कार्य जेवढे महत्त्वाचे असते, तेवढेच 'अंतर्गत' कार्यही महत्त्वाचे असते. शब्दांच्या, अर्थांच्या, आशयांच्या मानसप्रतिमा निर्माण करणे, स्मृतिबद्ध करणे, विचार

करणे, मनन–चिंतन करणे, अभिव्यक्तीसाठी विचारांचे--वाक्यांचे संघटन करणे, कल्पना करणे अशी भाषेची अंतर्गत कार्येच प्रत्येक माणसाचे 'मी'त्व घडवीत असतात. या कार्यांसाठी खासकरून भाषिक अनुभव मिळण्याची गरज असते.

**७. सर्जनशीलता** (Creativity)– भाषेचे एक खास वैशिष्ट्य म्हणजे, भाषा एकदा आत्मसात झाली, की तिचा विविधांगी सर्जनशील वापर करता येतो. वाङ्मय-निर्मिती हे त्याचे उत्कृष्ट उदाहरण आहे. भाषा बदलते, वेगवेगळी वळणे घेते, नवे नवे उपयोग निर्माण करते; हे सारे शक्य होते ते भाषेच्या अंतर्गत जिवंतपणामुळे. व्यक्तिगत पातळीवर भाषेची ही जिवंतता टिकविणे हे लहान वयातच, या सर्वांगांनी, तिच्या उपयोग करीत राहण्यावर अवलंबून असते.

ही विविध वैशिष्ट्ये लक्षात घेतली, तर भाषा हे अनेक पाकळ्यांचे एक फूल आहे हे जाणवेल. भाषा–फुलाचे अस्तित्व असते तेच मुळी या सर्व पाकळ्या एकाच वेळी पेलून धरण्यामुळे.

मुलांच्या भाषाशिक्षणविषयी आपण विचार करणार असू तर हे, सर्व पाकळ्यांसहित फुललेले फूल मुलांच्या पदरी पडेल, याची दखल आपल्याला घ्यावी लागेल. त्याला एखादीच पाकळी मिळून चालणार नाही, किंवा असेही चालणार नाही, की एक पाकळी आज आणि मग काही काळाने दुसरी, नंतर तिसरी; कारण, पुढची पाकळी मिळेपर्यंत मागची सुकून जायची वेळ येईल. त्यामुळेच, लहान मुलांच्या भाषाशिक्षणात विविधांगी भाषानुभव एकसंधपणे प्राप्त होण्याचे महत्त्व विशेष असते. सारे भाषाशिक्षण त्यासाठी अशा प्रकारच्या भाषानुभवांवर बेतावे लागते.

**भाषानुभव**

'अनुभवा'ची एक खासियत असते. अनुभव घेणारा हा त्या अनुभवप्रक्रियेत स्वतः सहभागी होत असतो. ह्या स्वतः सहभागी होण्याचे स्वरूप हे 'शरीरशास्त्रीय' स्वरूप असते. म्हणजे असे, की मन (म्हणजे मेंदू) आणि शरीर दोन्हीही एकदमच अनुभव घेण्याच्या प्रक्रियेत सहभागी होत असतात. (यालाच आपण 'सर्वांगाने अनुभव घेणे' असे म्हणू शकतो!) तन-मनाने शिकणे हेच परिणामकारक शिकणे असते.

मुलांच्या बाबतीत भाषा सर्वांगांनी आत्मसात व्हायची असेल, तर ती स्वानुभवातूनच यावी लागते. उपजत भाषिक क्षमतांना प्रेरित करीत जाणे, हे अनुभवांचे काम असते. हे कार्य मेंदूच्या पातळीवर होत असते. मेंदूमध्ये असलेल्या 'भाषाक्षेत्रा'मध्ये असलेल्या असंख्य पेशी उद्दीपित होणे, त्यांना नव्या वृक्षिका फुटणे, आधीच्या ज्ञानावर नव्या ज्ञानाच्या विटा रचल्या जाऊन भाषाज्ञान अधिक विकसित होणे व ते सारे दीर्घकालीन स्मृतिकोशात जाऊन बसणे या सगळ्या क्रिया व त्यांतील अनेक रासायनिक उपक्रिया घडून भाषा आत्मसात होत असते. भाषानुभवांकडून भाषाज्ञानाकडे असा होणारा हा प्रवास नैसर्गिक रीत्या पहिल्या आत्मसात केलेल्या भाषेकरवी होत असतो. भाषा सर्वांगांनी आकळून घेणे, त्यासाठी विविधांगी भाषानुभव घेणे आणि त्यांकरवी मेंदूपातळीवर भाषाज्ञानाची इमारत रचली जाणे असा तीन टप्प्यांचा हा प्रवास असतो. हा प्रवास सुकरतेने होणे म्हणजे भाषाशिक्षण होय!

**भाषाशिक्षणाचा शालेय व्यवहार**

या तात्त्विक चर्चेकडून आता भाषाशिक्षणाच्या शालेय व्यवहाराकडे वळले, तर काय आढळते?

१. मुळात भाषाशिक्षण हे आजवर शालेय स्तरावर महत्त्वाचे मानले गेले नाही. त्याकडे अजूनही मोठ्या प्रमाणात दुर्लक्ष आहे.

२. अलीकडे, बहुसंख्य पालकांचा ओढा, आपल्या पाल्यांच्या शिक्षणाबाबत इंग्रजी माध्यमाकडे आहे; हे वास्तव नाकारून चालणार नाही.

३. मराठी माध्यमातून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना पुरेशी इंग्रजी भाषा आत्मसात होत नाही, हेही वास्तव आपण नाकारून चालणार नाही.

४. मराठी माध्यमातील मुलांना 'सेमी–इंग्रजी'चा पर्याय दिल्यामुळे त्यांना; इंग्रजी माध्यमातील मुलांप्रमाणे इंग्रजी बोलता येईल, व्यवहारवापराचे इंग्रजी येईल, अशी जी पालकांची समजूत करवून दिली जात आहे, तो शुद्ध भ्रम आहे, हेही वास्तव लक्षात घ्यायला हवे.

खरेतर या सर्व वास्तव घटनांमुळे, शिक्षणक्षेत्रात काम करणाऱ्यांपुढे मोठा पेच निर्माण झाला आहे.

पालकांमध्ये संभ्रम निर्माण झाला आहे. वरील तीन वास्तवे परस्परांना पर्याय आहेत, असे जे सामान्यपणे मानले जात आहे, त्यातूनही प्रश्न सुटणार नाही. शालेय शिक्षणातील भाषाविषयक पेच सोडविण्यासाठी काही वेगळ्या दिशेने वाटचाल करावी लागेल, असे वाटते.

प्रथमतः हे पक्के लक्षात घ्यायला हवे, की शालेय शिक्षणाचा उद्देश, इंग्रजी येणे वा मराठी येणे असा नाही. सरकारने प्रसृत केलेल्या शिक्षणाच्या उद्दिष्टांतही तसे म्हटलेले नाही. शिक्षणाचा उद्देश मूलतः ज्ञानप्राप्ती असा असून भाषा (म्हणजे मराठी, इंग्रजी वा अन्य भाषा) हे या उद्दिष्टपूर्तीचे साधन आहे. या साध्य-साधनाची गल्लत झाल्यामुळे पालकांची अवस्था संभ्रमित आहे, असे म्हणता येईल. ज्ञानप्राप्ती हे साध्य आणि भाषा हे या प्रक्रियेचे साधन आहे, असे लक्षात घेतले, की भाषेचे शिक्षणातील स्थान हे साधनभूत म्हणून दुय्यम आहे, हे कळेल. अर्थात दुय्यम आहे म्हणजे ते महत्त्वाचे नाही, असे येथे सुचविलेले नाही.

साध्य-साधनाचो निश्चिती झाली, की मग त्यांच्या एकत्रीकरणातून तीन पर्याय उपलब्ध होतात.

१. ज्ञानप्राप्ती + इंग्रजी चांगले येणे.

२. ज्ञानप्राप्ती + मराठी चांगले येणे.

३. ज्ञानप्राप्ती + मराठी चांगले येणे+इंग्रजी चांगले येणे.

असे पर्याय दिले तर कुणीही सुज्ञ माणूस तिसरा पर्याय निवडेल, हे उघडच आहे.

आपण पहिल्या पर्यायाचा जरा खोलवर विचार करू या.

**इंग्रजीतून शिक्षण**

इंग्रजी माध्यमाच्या प्राथमिक शाळेत जेव्हा मराठी मुले प्रवेश घेतात, तेव्हा त्यांना नैसर्गिकतेने पहिली भाषा अवगत असल्यामुळे, मराठी चांगले येत असते. आता ती मुले प्रथमतःच इंग्रजीच्या प्रांगणात प्रवेश करीत असतात. येथे, इंग्रजी भाषेचा शालेय शिक्षणातील ज्ञानप्राप्तीचे एक साधन म्हणून त्यांना वापर करायचा असतो. म्हणजे मुलांना एकाच वेळी दोन गोष्टी करायच्या असतात. एक, ज्ञानप्राप्ती तर करायची असतेच; पण, त्याचबरोबर ज्ञानप्राप्तीचे माध्यमही शिकून घ्यायचे असते. या गोष्टीकडे बारकाईने पाहिले तर, शिकणाऱ्या मुलांच्या संदर्भातील काही बाबींची नोंद आपल्याला घेता येईल. एक, एकाच वेळी ज्ञान मिळविणे व ते मिळविण्याचे साधन म्हणजे इंग्रजी भाषा शिकणे या दोन गोष्टी एकदमच शिकण्याचा जबरदस्त ताण, आणि तोही लहान वयात, मुलांना पेलावा लागतो. (त्याचा त्यांच्या आरोग्यावरही अनिष्ट परिणाम होत असतो.) दोन, त्यांच्या शिकण्याच्या प्रक्रियेत माध्यमाच्या अडचणीमुळे सहजता राहत नाही; साहजिकच त्याचा 'आकलन बोजा'(cognitive load) मुलांवर पडतो. हाही एक ताणच असतो. तिसरा, नकळत घडून येणारा परिणाम अधिक गंभीर असतो. इंग्रजी भाषेतून शिक्षणाची सुरुवात करताना, पुरेशी माध्यम-भाषा येत नाही, तोवर विषयांचे आकलन कच्चे राहते. ज्ञानप्राप्तीच्या मार्गावर सुरुवातीलाच विद्यार्थ्यांना हा खडतर प्रवास करावा लागतो. ज्ञानप्राप्तीसाठी शाळेत प्रवेश घ्यायचा, पण ज्ञानप्राप्तीचा मुलांचा मार्गच खडतर करून ठेवायचा अशी काहीशी विसंगत कृती आपल्याकडून होते आहे, याचे भान सर्वांनी ठेवावयास हवे. इंग्रजी माध्यमातून शिकू पाहणाऱ्या मुलांच्या अडचणी येथे संपत नाहीत.

पुढे जेव्हा, म्हणजे साधारणपणे पाचवीपासून पुढे, शालेय विषय शिकण्याला पुरेशी इंग्रजी भाषा येऊ लागते, तेव्हा मुले शिक्षणव्यवस्थेत वरच्या स्तरावर पोचलेली असतात. वेगवेगळ्या विषयांमधील वरच्या दर्जाचा आशय समजावून घेत असतात. नवे काही आकलन करून घेत असतात. अशा वेळी, हे नवे आकलन त्यांना इंग्रजी भाषेच्या कक्षेत आणता येते. परंतु केवळ ज्ञानप्राप्तीच्या संदर्भात वेगळीच अडचण उपस्थित झालेली असते. विषयांचे आकलन किंवा ज्ञानप्राप्ती ही पायरीपायरीने, इमारतबांधणीसाठी विटांवर विटा रचाव्यात अशी होत असते. इंग्रजी माध्यमातील मराठी मुलांच्या बाबतीत, सुरुवातीचे किंवा आधीचे विषयआकलन-विषयांमधील संकल्पनात्मक आकलन - हे कच्च्या भाषेच्या साहाय्याने झालेले असल्यामुळे ते सामान्यपणे अर्धवट झालेले असते; नीट झालेले नसते. नवे ज्ञान हे नेहमीच आधीच्या म्हणजे पूर्वज्ञानाशी जोडून येत असते. त्यामुळे आता अडचण अशी निर्माण होते, की इंग्रजी माध्यमातील मराठी मुलांना, ज्ञानाच्या आधीच्या कच्च्या बांधकामावर नंतरचे पक्के बांधकाम करण्याची वेळ येते. त्यामुळे

ज्ञानाची पक्की इमारत त्यांच्याकडून बांधली जाणे दुरापास्तच होते. परिणाम असा होतो, की ही मुले भाषेसाठी ज्ञानाचाच बळी देतात; आणि मग भाषेच्या आशयाला तर ती मुकतातच, पण शिक्षणाचा 'ज्ञान' हा मूळ हेतूच काही प्रमाणात मारला जातो.

**मराठीतून शिक्षण**

मराठी मुलांनी मराठी माध्यमातून आपले शालेय शिक्षण घेतले, तर मात्र अशी अडचणीची परिस्थिती निर्माण होत नाही. शाळेत प्रवेश करण्यापूर्वीच त्यांनी मराठी भाषा पुरेशी अवगत केलेली असते, त्यामुळे ज्ञानप्राप्तीचे त्यांचे काम, शाळेच्या औपचारिक शिक्षणव्यवस्थेत, सामान्यपणे अगदी विनासायास सुरू होते. ज्ञानप्राप्ती आणि ज्ञानप्राप्तीसाठी साधनप्राप्ती असे दुहेरी ताण त्यांना पेलावे लागत नाहीत. उलट, एक नवाच फायदा त्यांना मिळतो, की जो इंग्रजी माध्यमातून शिकू पाहणाऱ्या मराठी मुलांना मिळणे शक्य नसते. हा फायदा असतो भाषिक समृद्धीचा. भाषिक क्षमतांची बहुतांश पूर्तता आपोआपच झाल्यानंतर मुले जेव्हा मराठी शाळेत शिकू लागतात, तेव्हा त्यांच्या विषय शिकण्याच्या बरोबरीने त्यांची मराठी भाषाही अधिक समृद्ध होत जाते. आणि निदान एका भाषेची समृद्धी ही माणसाच्या सामाजिक जीवनाची किमान गरज असते. अर्थातच इंग्रजी माध्यमातील मुले यापासून कायमची वंचित राहतात.

भाषाशिक्षणाविषयीचा एक वेगळाच मुद्दाही विचारात घ्यायला हवा. इंग्रजी ही जेव्हा आपली पहिली आत्मसात झालेली भाषा नसते, तेव्हा ती शिकणे हे एका भाषेकरवी दुसरी भाषा शिकणे, या स्वरूपाचे असते. माणसाला कुठलीही एक भाषा पक्की येत असेल, तर तिच्याकरवी दुसरी कोणतीही भाषा शिकता येते. त्यामुळेच मराठी भाषा पक्की असली, तर इंग्रजी भाषा शिकणे फारसे कठीण नसते. परंतु इंग्रजी माध्यमाच्या बहुतेक शाळांतून अशी प्रथा अवलंबिली जाते, की मुलांना इथून पुढे इंग्रजीतून शिकायचे असल्यामुळे त्यांनी मराठीचा वापर व्यवहारात करता कामा नये. याचा परिणाम असा होतो, की त्यांची पहिल्या भाषेच्या समृद्धीची वाट थबकते. साहजिकच कुठलीही नवी भाषा शिकण्याचे एक साधनच कमकुवत राहते. अशी मुले पुढे आयुष्यभर 'इंग्रजाळलेली मराठी' बोलतात. ज्ञानभाषा म्हणून त्यांची कोणतीच भाषा समृद्ध होत नाही; गरज निर्माण झाली, तर नव्या वेगळ्या भाषा शिकण्यातही अडचण येऊ शकते.

पहिली समृद्ध भाषा ही आपली ज्ञानभाषा असते, कारण ती आपली विचाराची-मननाची नि चिंतनाची भाषा असते. बाहेरून ज्ञानेंद्रियांकरवी मिळणाऱ्या माहितीचे रूपांतर जेव्हा स्वतःच्या ज्ञानात केले जाते, तेव्हा अपरिहार्यपणे आपण विचार-मनन-चिंतन या साधनांचा आश्रय घेत असतो; आणि समृद्ध भाषा हा तिचा पाया असतो.

हे सगळे तात्त्विक विवेचन लक्षात घेतले, तर निष्कर्ष असा निघतो, की प्रत्येक माणसालाच एका तरी समृद्ध भाषेची गरज असते. परंतु, इंग्रजी माध्यमातून शालेय शिक्षणाकडे वळणारी मुले त्यांची मराठी भाषा समृद्ध करण्याची संधी गमावतात आणि इंग्रजी भाषा समृद्ध करण्याची ताकद कमावतातच असे नाही. एकही भाषा समृद्ध होत नाही, आणि हाती पडते ती मात्र गल्लत भाषा!

याचा अर्थ असा, की 'ज्ञानप्राप्ती + इंग्रजी' हा पर्याय दोन्ही शैक्षणिक घटक म्हणजे ज्ञान व भाषा कमकुवत ठेवत असल्यामुळे या पर्यायापेक्षा 'ज्ञानप्राप्ती + मराठी' हा दोन्ही घटक समृद्ध करणारा पर्याय खासच उजवा ठरतो. परंतु स्पष्टता झाली तरी प्रश्न सुटत नाही.

**द्विभाषा समृद्धी**

गरज असो वा नसो, लोकांना इंग्रजी भाषेचा गंड निर्माण झाला आहे हे वास्तव आहेच, आणि त्याचे समाधान होण्याची गरज आहेच. म्हणजेच आपल्याला, तिसऱ्या पर्यायाकडे, म्हणजे 'ज्ञानप्राप्ती + मराठी चांगले येणे + इंग्रजी चांगले येणे' याकडेच जायला हवे. व्यवहारातील याचा अर्थ असा, की मराठी माध्यमातून शिकणाऱ्या मुलांना इंग्रजी भाषेचेही उत्तम बाळकडू मिळायला हवे. हे घडणे शक्य आहे, हे लोकांना कळले पाहिजे, पटले पाहिजे. त्यासाठी प्रथमतः त्यांनी त्यांचा एक गैरसमज ठामपणे मनातून काढून टाकला पाहिजे. तो म्हणजे, इंग्रजी शिकायचे तर इंग्रजीतूनच सारे काही शिकले पाहिजे असे वाटणे. 'इंग्रजी शिकणे' आणि

'इंग्रजीतून शिकणे' या दोन वेगळ्या गोष्टी असून मुलांना इंग्रजीतून शिकण्याचे ओझे न बाळगता इंग्रजी शिकायला मिळाले, तर ते सोन्याहून पिवळे ठरेल! पुढील पायऱ्या घेऊन हे घडविता येईल असे वाटते.

१. शिक्षणात सर्वांत महत्वाची असते ती ज्ञानप्राप्ती. ज्ञानप्राप्तीच्या प्रक्रियेत विषयांचे आकलन कच्चे राहून चालणार नाही, हे उघडच आहे. त्यातही प्राथमिक स्तरांवरचे सुरुवातीचे शिक्षण हा पुढील शिक्षणाचा पाया असतो, म्हणून आकलनपातळीवर ते पक्केच असायला हवे. त्यामुळे, सुरुवातीच्या काळातील सारे शिक्षण, पुरेशा प्रमाणात येत असलेल्या मराठी भाषेतूनच मराठी मुलांनी घ्यावयाचे. यातून दोन गोष्टी घडून येतील. एक म्हणजे, मुलांचे ज्ञानप्राप्तीचे काम ताणविरहित, विनासायास व परिपूर्णतेने चालू राहील; दोन, मुलांची पहिली भाषा जी मराठी ती, याच भाषेतून विविध विषयांचे शिक्षण चालू ठेवल्याने अधिक समृद्ध होत जाईल.

२. इंग्रजी भाषा, आजवर शाळांतून शिकविली जात आहे तशी क्रमिक पुस्तकातून, प्रश्नोत्तरे पाठ करून, केवळ लिहून-वाचून शिकायची नाही; तर ती ज्या नैसर्गिक पद्धतीने मराठी ही पहिली भाषा अवगत केली गेली, त्याच पद्धतीने शिकायची असते. माणसाच्या नैसर्गिक क्षमतांचा वापर होऊन येणारी भाषा ही नेहमीच इतरांकडून भरपूर ऐकून, ऐकलेल्याचा आपला आपण अर्थ लावून, अर्थपूर्ण शब्दांचा संग्रह स्मृतीत साठवून आणि इतरांसाठी बोलून भाषेची अभिव्यक्ती करत करतच सर्वांना आत्मसात होते. हीच पद्धत इंग्रजीसाठीही वापरता येणे शक्य आहे. त्यासाठी क्रमिक पुस्तके नव्हे, तर क्रमवार कार्यक्रम आखावा लागेल. मुलांना भरपूर बोलण्या-ऐकण्याच्या संधी द्याव्या लागतील.

यातही एक क्रमवारी आहे. आधी भाषा ऐकून 'समजणे' ही गोष्ट येते, 'बोलणे' मग येते. ऐकून 'समजणे' ही मेंदूच्या पातळीवर घडून येणारी खूप गुंतागुंतीची प्रक्रिया आहे. भाषा 'ऐकणे', आणि भाषा 'समजणे' या दोन अगदी भिन्न गोष्टी आहेत. कानांच्या साहाय्याने बाह्य जगातील भाषा 'ऐकली' जाते. शब्दोच्चार, वाक्योच्चार कानावर पडतात. परंतु मेंदूत त्यांचा अर्थ लावल्याशिवाय 'समजण्या'ची क्रिया घडून येत नाही. हे अर्थ लावणे, व्यक्तीचे स्वनिर्मितीचे काम असते. गंमत अशी, की ही अर्थ लावण्याची प्रक्रिया जन्मापासूनच चालू होते. बालकांचे काहीतरी उच्चार तोंडावाटे करून बोलण्याचे काम सुरू होते. ते एक ते सव्वा वयवर्षापासून. तोपर्यंतचा काळ हा बालकाच्या आयुष्यातील अबोलतेचा काळ असतो. मात्र या काळात भाषा ऐकण्याचे आणि त्याच्या अर्थनिश्चितीचे काम अतिशय वेगाने चालूच असते. शब्दध्वनी, शब्दोच्चाररीती (accents), व्याकरणीय रचना आणि शब्दार्थ यांचे एकत्रित असे आकृतिबंध बालकाच्या मानसपातळीवर तयार होत जातात. यातून 'भाषातनू' म्हणजे भाषेची शरीराकृती आकळून घेतली जात असते. भाषा अशा तऱ्हेने अंगभूत होत असते. किंबहुना ही पूर्वतयारी झाल्याशिवाय मुले बोलायला लागत नाहीत.

भाषा समजावून घेण्याच्या प्रक्रियेला पुरेसा वेळही द्यावा लागतो. कारण, ऐकलेली भाषा मनात घोळली जाते. ही पुन्हा पुन्हा घडणारी घोळण्याची क्रिया वेळ घेऊनच होत असते. मुले बोलायला लागल्यानंतर एखादा शब्द समजावून घेताना 'याला काय म्हणतात?' 'हे काय आहे?' असे पुन्हा पुन्हा विचारतात. तेव्हासुद्धा या शाब्दिक कृतीतून शब्द मनामध्ये पुन्हा पुन्हा घोळून तो आत्मसात करण्याचेच काम चालत असते.

थोडक्यात असे, की भाषा शिकण्याच्या नैसर्गिकतेशी इमान राखून इंग्रजी भाषा, एक दुसरी भाषा म्हणून शिकायची असेल, तर पुढील पायऱ्यांनी शिकता येईल.

१. अगदी बालपणापासून मुलांना मराठी भाषेबरोबरच, भरपूर इंग्रजी भाषा (व्याकरणासहित) ऐकायला मिळणे, बडबडगीतांपासून ते गोष्टी ते संभाषण-भाषणांपर्यंत ऐकायला मिळणे आवश्यक आहे. इंग्रजी भाषा येणाऱ्याच्या सहवासात राहायला मिळाले, तर उत्तमच. आजच्या तंत्रयुगात सीडींचा उपयोग करून घेता येईल. कुटुंबाप्रमाणेच शाळांनाही हे करता येईल.

२. ऐकलेल्या इंग्रजीवर मनन करणे – मनात भाषा घोळवणे व यासाठी पुरेसा वेळ देणे. प्रत्यक्ष शिकण्याच्या वेळेपेक्षा अन्य वेळात, आपण जे शिकतो त्याची मनात उजळणी करणे, मनातल्या मनात अन्य व्यक्तींशी संभाषण करणे, नव्याने वाक्ये रचून पाहणे, असा 'अंतर्गत

अभ्यास' करण्याची पायरी घेणे, त्याची सवय लागणे, ही गोष्ट भाषा अंगभूत करण्यासाठी खूपच उपयुक्त आहे. ऐकणे आणि बोलणे या दोन पायऱ्यांमधील, भाषा समजावून घेण्याची जी पायरी आहे, ती पक्की होण्यासाठी भाषा मनामध्ये घोळण्याची पायरी उपयोगी आहे.

३. तिसरी पायरी आहे ती ती प्रत्यक्ष बोलण्याची. भाषा ऐकणे, अर्थाने समजावून घेणे आणि भाषा मनात घोळणे या तीन पायऱ्यांची पूर्वतयारी झाली की, भाषा बोलता येणे फारसे कठीण नसते. विशेषतः ऐकून, मनाच्या कोशामध्ये जमलेला शब्दसंग्रह आणि व्याकरणयुक्त भाषारचना यांचाच वापर करून भाषा बोलली जात असते. शिवाय भाषा मनात घोळताना, आपण मनातल्या मनात भाषा 'बोलत'च असतो. त्यामुळे त्याचे मौखिक बोलण्यात प्रकटीकरण सहज होते. मुले इंग्रजी बोलू लागतात.

**इंग्रजी बोलण्याचा आत्मविश्वास**

मुलांना इंग्रजी बोलण्याचा आत्मविश्वास हा इंग्रजी बोलण्याच्या प्रयत्नांतूनच येत असतो. बिनदिक्कत चुका करत, सारख्या चुका दुरुस्त न करताही, सतत बोलत गेल्यास भाषा बोलण्याचा आत्मविश्वास दुणावतो. मात्र सारख्या चुका काढणे, त्या दुरुस्त करणे याचा उलटाच परिणाम होऊन आत्मविश्वास कमी होतो. त्यासाठी मुलांनी भाषेशी खेळले पाहिजे. उलटसुलट भाषा वापरून पाहिली पाहिजे. थोडेबहुत जरी इंग्रजी बोलता येऊ लागले, की इंग्रजी बोलण्याची आवड निर्माण होऊ लागते. इतरांच्या बोलण्यातल्या भाषिक लकबींकडे लक्ष जाऊ लागते. आपल्याला जे काही म्हणायचे आहे, त्याची अभिव्यक्ती इंग्रजीतूनच करावी अशी इच्छा होऊ लागते. या साऱ्यातून इंग्रजीशी सलगी वाढू लागते.

मुलांना इंग्रजी बऱ्यापैकी बोलता येऊ लागले, की भाषेच्या प्रगतीच्या पुढच्या पायऱ्या घेणे फारसे कठीण नसते. लेखन-वाचनाची कौशल्ये अधिक सहजतेने अंगवळणी पडतात. पुढेपुढे तर या भाषेकरवीही, पहिल्या मराठी भाषेप्रमाणेच, पण स्वतंत्रपणे, आधीच्या ज्ञानाच्या आधावर नव्या ज्ञानविटा रचण्याचे कामही सरावाने, मिळणाऱ्या संधीमुळे सहजतेने होऊ शकते. अशा प्रकारे इंग्रजी भाषा बोलायला शिकणे हा इंग्रजी भाषा येण्याचा खराखुरा अर्थ आहे!

**सारांश**

थोडक्यात असे, की जेथे घरात किंवा परिसरात दोन भाषांचे वातावरण असते, तेथे मुले नैसर्गिक रीत्याच दोनही भाषा 'पहिल्या भाषा' म्हणून आत्मसात करतील. परंतु जेथे एकाच भाषेचे वातावरण असते, तीच 'पहिली' भाषा असते, तिथे तिच्या समृद्धीवर लक्ष पुरवावे. कारण, ती ज्ञानप्राप्तीची, विचारांची, भावनांची भाषा तर असतेच; पण त्याचवेळी ती दुसरी भाषा शिकण्याची माध्यमभाषाही असते. मराठी मुलांनी आपली मराठी भाषा, मराठीतून शिकून समृद्ध केली, तर तिच्या आधारे इंग्रजी भाषा शिकणे कठीण जाणार नाही. मात्र तिच्यातही आधी ऐकणे, मग बोलणे आणि नंतरच वाचायला व लिहायला शिकणे, असा क्रम असावा लागेल.



अनुक्रमणिका

# ब्रिटिश राजवटीत विदर्भात जात, वर्ग आणि संस्कृती
# १८५३ ते १९४७

प्रभाकर गद्रे

जात या मानानीक विभागाची ढोबळ व्याख्या अंत:र्विवाह करणारा आणि विशिष्ट सामाजिक भूमिका बजावून अंतर्गत सीमा राखणाऱ्या व्यक्तींचा समूह अशी असते. 'शुद्धी आणि प्रदूषण' याच्या प्रमाणात त्याचा दर्जा मोजता येतो. या सर्व जाती परस्परांशी उच्च, कनिष्ठत्वाच्या दर्जाने संलग्न असतात व या साऱ्या उतरंडीला हिंदू समाज म्हणता येते. पण जात केवळ सांस्कृतिक विभाग नाही. त्याचे महत्त्वाचे व्यावहारिक महत्त्व आहे. कारण प्रत्येक जातीशी वंशानुगत परंपरागत व्यवसाय संलग्न आहे. तेथे सामाजिक श्रमविभाग दिसून येतो. येथे जातीची वर्गाशी तुलना करता येते. येथे वर्ग उत्पादक शक्ती आणि संपत्तीच्या मालकी हक्काशी संलग्न आहे. पण जात-वर्ग या दोन संकल्पना समाजसंघटनेच्या दोन वेगवेगळ्या पद्धतींतील आहेत. जातिपद्धतीत हे संबंध आर्थिक परस्परावलंबनाच्या स्वरूपाचे दिसतात व परस्परसहकार्यावर अवलंबून असतात. व्यावसायिक आणि व्यावहारिक विशेषीकरणाच्या स्वरूपात या उतरंडीचे कधीही विसर्जन झाले नाही. उलट, दोघांमध्ये स्पर्धा दिसून येते [१] आणि वर्गरचनेच्या गुंतागुंतीत शेवटी ही स्पर्धा आहेरे आणि नाहीरे अशा दोन वर्गात विभाजित होण्याची अपेक्षा आहे.[२] जातिव्यवस्था हे संघटित जैविक वर्गीकरण आहे, तर वर्ग हे गटागटांचे वर्गीकरण आहे. या दोन्हींत सहकार्य आणि स्पर्धा दिसून येते.

पण वर्ग आणि जातीचे हे व्याख्यात्मक भेद तात्त्विकच आहेत; व्यावहारिक नाहीत. आंतरजातीय संबंधात संघर्षाच्या अभावाची कारणे फार ताणली गेली आहेत.[३] कारण जातिव्यवस्थेची आपली समजूत ब्रिटिश काळातील नृवंशशास्त्रीय चर्चेवर अवलंबून आहे. त्यामुळे आर्थिक क्षेत्रातील सहकार्य स्वयंस्फूर्त नसून लादलेले आहे, संस्कृतीच्या दर्जाचे गुण आणि सामाजिक भूमिकासुद्धा लादलेल्या आहेत. व्यक्तीचा सांस्कृतिक व धर्मनिरपेक्ष दर्जाशी जवळचा संबंध असल्यामुळेच हे शक्य आहे. यामुळे वर्गीय स्थिती बहुधा धर्माच्या जातिवाचक स्वरूपातूनच प्रगट होते.

पण भारतीय इतिहासात व्यावसायिक परिचलन-सुद्धा प्रत्येक काळात दिसून येते आणि ब्रिटिश राजवटीत संपत्ती आणि सत्तेचे अधिक विकेंद्रीकरण झाल्याचे मानले जाते. प्रत्येक जातीतील व्यावसायिक आणि दर्जात्मक फरकावरून दिसते, की जात आणि वर्ग परस्परसमांतर असले, तरी ते परस्परविरोधीसुद्धा होऊ शकतात. पण उपलब्ध पुराव्यावरून जातीचा आर्थिक दर्जा आणि तिची सामाजिक भूमिका यांतील भेद विलीन होऊन प्रत्यक्ष संपत्ती आणि सत्तेच्या वितरणात शुद्धतेच्या आधारावरील धार्मिक दर्जा दिसून येतो. यामुळे वर्गपद्धती जशी गतिमान असते, तशी जातिपद्धतीसुद्धा गतिमान दिसुन येते.[४]

दुसऱ्या शब्दांत जातिव्यवस्थेला सत्तेचा सांस्कृतिक आराखडा म्हणता येईल.[५] हा सांस्कृतिक आराखडा असल्यामुळे भारतीय समाजातील सत्तासंतुलन किंवा वर्गीय संबंधानुसार तो बदलत असतो. वर्चस्व असलेल्या जाती किंवा वर्गाची सत्ता यातील सर्व दर्जाचे भेद वरती येणाऱ्या गटांशी सहकार्य करून मिटविता येतात व आपली सत्ता कायम राखता येते. या सत्तासंतुलनास सुरुंग लावणाऱ्या सामाजिक चळवळीने वर्गवर्चस्व अधिक स्पष्टपणे दिसते.

इंग्रजांच्या राज्यापूर्वी भौतिक समृद्धी, राज्यसत्ता आणि उच्च धार्मिक दर्जा हा एकाच जातीत केंद्रित होता. वर्ग आणि जातीचा हा संबंध बाकाटक काळापासून आहे. तो अठराव्या शतकात सविस्तर पुराव्याने सिद्ध होतो. महाराष्ट्रात शेतीचा विस्तार होऊ लागल्यापासून शारीरिक श्रम आणि सफाईकाम करणाऱ्यांचा दर्जा घटू लागला व पुजारी-कारकून आणि वैद्यांचा धार्मिक-सामाजिक दर्जा वाढला. जातिपद्धतीने जमिनीची मालकी ही कनिष्ठ जातींना मिळेना; त्यामुळे ब्रिटिश राजवटीपूर्वी मोठ्या प्रमाणावर ग्रामीण कामगार निर्माण झाला[६] व तो जातिपद्धतीच्या मध्यम व उच्च वर्गाच्या मालकीच्या जमिनीवर काम करीत असे.[७] त्यामुळे अतिरिक्त उत्पन्न








मिळविण्यासाठी जातीय उतरंडीची रचना झाली, असे म्हणण्यात अतिशयोक्ती होणार नाही. अर्थात या उतरंडीत सर्वांना त्यांच्या त्यांच्या दर्जाची सामाजिक सुरक्षा मिळाली.

इंग्रजांच्या राज्यापूर्वीचा समाज स्थिर किंवा जड नव्हता. इ. स. १७९८ मध्ये कोलब्रुकने म्हटले आहे, की प्रत्येक व्यवसाय काही अपवादाखेरीज सर्वांना खुला होता.[७] जेंकिन्सनेसुद्धा आपल्या अहवालात प्रत्येक व्यवसायात इतर जातीच्या व्यक्ती दिसून येतात, असे म्हटले आहे.[८] ही व्यावसायिक परिवहनता आणि विभेद ब्रिटिश राजवटीत अधिक वाढून परंपरागत उत्पादन-व्यवस्था बदलेल व जातिव्यवस्थेला आर्थिक व्यवस्थेपासून वेगळे करेल, अशी अपेक्षा होती. भूमी-विक्री योग्य झाली आणि नोकऱ्या योग्यतेनुसार मिळू लागल्या आणि स्पर्धा नसलेल्या समाजात स्पर्धा निर्माण झाली. जमिनीच्या वारंवार खरेदी-विक्रीने संपत्तीचे विकेंद्रीकरण होऊन शहरी औद्योगिक संस्कृती परंपरागत समाजव्यवस्थेला आव्हान देऊ लागल्यामुळे जातिव्यवस्था विलयाला जाईल, असे अनेक विचारवंतांना वाटू लागले.

पण जातिव्यवस्था विलयास गेली नाही. कारण सामाजिक परिवहनता आणि विभेद हे फारच मर्यादित होते. त्यामुळे प्रचलित समाजव्यवस्थेवर त्याचा विशेष प्रभाव पडला नाही. विदर्भात, विशेषतः पूर्व विदर्भातील झाडीपट्टीत वन्य जमिनी शेतीखाली आल्याने अनेक जातींना आपली स्थिती सुधारण्यास वाव मिळाला, पण याचा फायदा दुसऱ्या प्रांतातील वसाहतकारांनी घेतला आणि माळवी, मारवाडी, जाट, मराठा, कोहळी, पठाण व तेलगु लोकांची वस्ती वाढली. या लोकांनी आपआपली, मूळ प्रदेशातील जातिव्यवस्था कायम ठेवली आणि बख्तबुलंद किंवा दुसऱ्या रघुजीने पद्धतशीर प्रयत्न करूनसुद्धा समाजाच्या मूळ जातिव्यवस्थेत काही बदल झाला नाही. कोणत्याही जातीबाबत अगदी तळागाळाची जात वरती आली, असे झाले नाही. एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पादातील खानेसुमारीवर विश्वास ठेवायचा तर त्यातून अगदी खरे नाही, तरीपण ढोबळमानाने खरे असे सामाजिक प्रवाह दिसून येतात. एवढेच काय, विसाव्या शतकाच्या प्रारंभीसुद्धा व्यवसाय सर्वांना मुक्त असले, तरी कोणत्याही जातीतील बहुतांश लोक आपला, परंपरागत व्यवसाय सोडून दुसऱ्या व्यवसायात गेले, असे झाले नाही. विदर्भातील शेतकरीसमाज त्यातील कर देणारे आणि कर वसूल करणारे या लोकांत उच्च श्रेणीत निरनिराळ्या प्रदेशांचे ब्राह्मण आणि कर देणाऱ्या लोकांत कुणबी आणि इतर क्षुद्र जातीसमाजाचे लोक आढळतात. उच्च जातींनी शिक्षणात, पांढरपेशा नोकऱ्यांत आणि औद्योगिक नोकऱ्यांत वर्चस्व मिळविले आणि थोडेफार अतिरिक्त भांडवल असल्यामुळे उच्च आणि मध्यम वर्गाच्या लोकांनी परकीय व्यापार कंपन्यांनी देऊ केलेल्या नव्या संधींचा फायदा घेतला. दुसऱ्या शब्दांत ब्रिटिश काळात जातीच्या संदर्भात बहुतेक बदल झाले नाही. आणि सामाजिक दृष्ट्या गतिमान गट हिंदू जाति-व्यवस्थेत समाविष्ट झाले. उदा., चिटणीस, बुटी.

यामुळे हिंदू समाजातील सत्तासंतुलन व सांस्कृतिक दर्शन तपासणे आवश्यक आहे. जातिव्यवस्थेने समाजातील प्रत्येक गटास त्यांचा जातिधर्म ठरवून दिला आहे. तो प्रत्येक समाजाला पाळावाच लागतो.[९] हा जातिधर्म शरीरशुद्धी किंवा अशुद्धीवर अवलंबून असतो व त्यानेच त्याचा धार्मिक तसेच सामाजिक दर्जा ठरतो. जातिधर्मापासून विचलित झाल्यास त्याचे पतन होते; त्यामुळे स्थानिक समाजाशी त्याचा कोणत्याही प्रकारे संबंध राहत नाही व सामाजिक सेवा मिळणेही बंद होते. गावातील नव्हे तर गावगाळ्याबाहेरचे लोक–अल्फ्रेड लायल ज्यांना आर्येतर आदिवासी किंवा जातिहीन जमाती म्हणतो ते गावगाळ्याबाहेरचे लोक-हिंदू धर्माच्या चौकटीत शिरत होते, तेसुद्धा या वर्तनधर्माचे अनुकरण करतात.

नवीन वर्गातील संस्कृतीकरण आणि समाजातील सांस्कृतिक सनातनी पण सत्तारूढ वर्गात सत्तासंघर्ष निर्माण झाला नव्हता. हिंदू समाजात प्रवेश मिळवून आपले स्थान कायम राखण्यसाठी हिंदू धर्माचा वर्तनक्रम स्वीकारणे आवश्यक होते. या वर्तनक्रमात उतरंडीचा तात्त्विक सिद्धान्त असून यात आध्यात्मिक ज्ञानामुळे ब्राह्मणांस प्राधान्य दिलेले आहे. ब्राह्मण त्यांच्या ज्ञानामुळे हिंदूंच्या सामाजिक व्यक्तिगत वर्तनाचे न्यायाधीश मानले जातात. पण ब्राह्मण व त्यांच्या पोथ्यांचे प्राधान्य व्यवहारापेक्षा भारतविदातच्या तत्त्वचर्चेतच अधिक दिसून येते.[१०] समाजातील शिस्त आणि ब्राह्मणांच्या आदेशाचे

प्रत्यक्ष अनुपालन हे वैदर्भीय हिंदू समाजाच्या संपूर्ण समाजास नियंत्रित करणाऱ्या सत्तासंतुलनावर अवलंबून होते.

मध्ययुगीन विदर्भात प्रादेशिक राजा, देशमुख, देशनायकावर राज्याच्या केंद्रीय अधिकाऱ्याचे नियंत्रण नव्हते. ते विदर्भाच्या समाजाचे सामाजिक राज्यकर्ते होते. प्रत्येक जातीची जातिसभा होती व तीच प्रत्येक जाती व कुटुंबाचे विवाद सोडवीत असे. राजा हा स्वतःच्या जातीचा प्रमुख, त्याच प्रकारे त्याच्या राज्यातील सर्व जातिसभांचा प्रमुख होता. तो आपल्या प्रजेला संरक्षण देत होता, कायदा आणि व्यवस्था राखत होता. नव्या जमिनी वसवीत होता आणि कलाकार व सेवक जातीच्या सेवेला आश्रय देत होता. जातीतले व इतर वाद मिटवून विशिष्ट सामाजिक व नैतिक वर्तनाची अंमलबजावणी करीत होता.[११] सामाजिक नियंत्रणाची ही मध्ययुगीन पद्धत ब्रिटिश राजवटीच्या प्रारंभिक काळातसुद्धा जारी होती. अनेकदा इंग्रज अधिकारी मराठा राजांच्या निर्णयाचे अनुकरण करीत. पूर्वी राजा, देशमुख, देशनायक यांचा वैदर्भीय हिंदू समाजावर कमालीचा प्रभाव होता. ब्राह्मणाशी सल्लामसलत करून तेच धार्मिक व सामाजिक वर्तनाचे नियम सांगत व त्यांचे सर्व पालन करीत असत.[१२] पण विशेष म्हणजे जेव्हा ब्राह्मणेतरांनी जमीन व राज्य-सत्ता संपादन केली– उदा.. चांदा व देवगड गुण, त्यांचा धार्मिक दर्जाही बदलला व तेही ब्राह्मणी हिंदुत्वाचे रक्षक बनले. वीरशैव देशमुख किंवा महार मलक्या साधूने यास विरोध केला असता त्यांना सक्त सजा भोगावी लागली. त्यांनी ब्राह्मणांना उदारपणे भूमिदान दिले व मंदिर बांधण्यास अनुदान दिले, तेव्हा ब्राह्मणांनी त्यांच्या दर्जाला मान्यता दिली; पण त्यांनी मुस्लीम धर्म स्वीकारताच ही मान्यता काढुन घेतली. राजा आणि ब्राह्मण यांतील ही युती एका गटाला आर्थिक व राजकीय शक्ती व दुसऱ्यास पुराणपोथीच्या ज्ञानाचा एकाधिकार ही लोकप्रिय संस्कृती नियंत्रित करून मध्ययुगीन व प्रारंभिक विदर्भात सामाजिक शिस्तीचे अनुपालन करीत होती.

उच्च जातींची ही युती एकोणविसाव्या शतकात बदललेल्या राजकीय परिस्थितीत आणि सामाजिक उत्पादनव्यवस्थेत झालेल्या बदलास अनुसरून कायम होती. राज-पंडित युती निरनिराळ्या संस्थांतून काम करू लागली. त्या संस्था म्हणजे आखाडे, सभा आणि मंडळ. उदा., वऱ्हाड सार्वजनिक सभा (१८८६), लोकसभा (१८८७), गोरक्षण सभा (१८८८), लॉयल महासभा. यांपैकी लोकसभेच्या शाखा संपूर्ण प्रदेशात पसरल्या. गोरक्षण सभेला धार्मिक व आर्थिक महत्त्व होते. अशा प्रकारच्या ४९ सभा ह्या प्रांतात स्थापन करण्यात आल्या.[१३] यांपैकी सामाजिक दृष्टीने महत्त्वाची संस्था लोकसभा होती. तिचे नेतृत्व आर्थिक दृष्ट्या संपन्न, ब्रिटिशांचा पाठिंबा असलेले आणि राजघराण्याशी उघड निष्ठा असलेल्या चिटणिसांकडे होते. हे घराणे चांद्रसैनीय कायस्थ प्रभु असले, तरी 'त्यांचे आचारविचार उच्चवर्गीय ब्राह्मणासारखेच दिसून येतात'[१४] त्यांच्या सोबतीला इंग्रज व मराठ्यांचा पाठिंबा असलेले बुटी हे चरक ब्राह्मण घराणे व त्यांच्या पाठोपाठ दंडीगे, औरंगाबादकर, पारखी ही देशस्थ ब्राह्मण घराणी पुढे आलेली दिसतात. महाविद्यालयातही ताम्हणे (चा.का.प्र.) प्राचार्य होते. नंतर इंग्रजांची नियुक्ती झाल्यावर राष्ट्रीय पक्षांनी दुसरी कॉलेजेस काढली. राजाराम दीक्षित वाचनालय १८६९ पासून बीजरूपाने व १८९५ पासून औपचारिकपणे तसेच नेटिव जनरल लायब्ररी १८८२ मध्ये स्थापन झाली. वृत्तपत्र काढण्यात व चालवण्यात ब्राह्मणांचा हात प्रामुख्याने होता. न्यायमूर्ती पी. पदवे प्रामुख्याने ब्राह्मणांना मिळत होते.

मूलभूत संघटनात्मक बदलास तीव्र प्रतिकार करण्यात आला. त्यामुळे जातिश्रेणीस जे सुधारण्याचे व निर्मूलनाचे आव्हान मिळाले, ते विदर्भाच्या इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. या आव्हानास तोंड देण्यासाठी हिंदू धर्माचे रक्षक निरनिराळे युक्तिवाद करून जातिसंस्थेचे समर्थन करू लागले. हिंदू समाजातील सुधारक 'समानता' या पाश्चात्त्य कल्पनेने प्रेरित झाले होते, तर जातिव्यवस्था उतरंडीवर आधारित होती. त्यामुळे समानता हे तत्त्वच असंबंधित आणि अव्यवहार्य आहे, असे सिद्ध करण्याचे प्रयत्न झाले. सर्व समाजात, विशेषतः पाश्चात्त्य समाजात निरनिराळ्या प्रकारचे गट असतातच. म्हणून जातिव्यवस्थेत काहीच अनैसर्गिक नाही. तेव्हा केवळ हिंदूंवर टीका








करणे किंवा त्यांची सामाजिक संघटना मोडणे निरुपयोगी आहे, असा युक्तिवाद करण्यात आला. दुसऱ्या एका गटाने पाश्चिमात्य नैसर्गिक विज्ञानातील वंशशास्त्रावा आधार घेऊन सांगितले, की नैसर्गिक गुण किंवा क्षमतेनुसार निसर्गातील संपूर्ण प्राणिमात्रात वर्गीकरण अस्तित्वात असते; म्हणून जातिप्रथा वैज्ञानिक आहे. पण जातिव्यवस्था ही हिंदू धर्माचा आधार आहे, हा युक्तिवाद सर्वांत महत्त्वाचा आहे. कारण जातिधर्म नष्ट केल्यास हिंदू धर्मसुद्धा नष्ट होतो. त्यामुळे जात ही समाजघातक संस्था असली, तरी हिंदू धर्माचा मूलाधार आहे. हा आधार काढून घेतला, तर धर्माचा मूळ जीवन-आधारच नष्ट होतो. हा युक्तिवाद विदर्भात सार्वत्रिक झाला.[१५] सामाजिक उतरंड आणि सामाजिक वैशिष्ट्यीकरण हे ईश्वरीय असल्यामुळे ते चिरंजीव आहे, असा मुख्य युक्तिवाद होता. जात आणि हिंदुत्वाचा सेंद्रिय संबंध जाणुनबुजून दाखवून सामाजिक उतरंडीस वैधता मिळविण्याचा व सुधारणावादी चळवळी दुर्बल करण्याचा प्रयत्न करण्यात आला.

जातिसमाजाला सर्वांत मोठे आव्हान आर्थिक परिवहनाचे होते. त्यामुळे जात आणि वर्ग यांचा संबंध तुटण्याची शक्यता निर्माण झाली. समाजातील आर्थिक व राजकीय बदल सामावून घेण्यापुरती लवचीकता हिंदू समाजात नेहमीच होती. वर येणाऱ्या समाजगटास वेळोवेळी उच्चभ्रूंत समाविष्ट करून पूर्ण रचनेचे मूलतत्त्व रक्षण्यात येत होते. एकोणिसाव्या शतकात विदर्भातील सर्व जाती एकतर द्विज किंवा शूद्र घोषित करण्यात आल्या. अठराव्या शतकातसुद्धा हा सूर दिसून येतो.[१६] विसाव्या शतकातही अशा व्यवस्था देणे चालू होते. अर्थात त्याला आव्हान देणारे जातीच्या धर्मनिरपेक्ष कल्पनेने प्रभावित झाले होते. चिटणिसांच्या नेतृत्वाखाली 'लोकसभा', खापर्डे, मुंजे, अणे यांच्या नेतृत्वाखालील मंडळांनी गणेशजयंती आणि शिवजयंतीचा आक्रमक पुरस्कार करून सांस्कृतिक राष्ट्रवादाचे बीजारोपण केले. यांच्या पाठोपाठ राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे संस्थापक डॉ. केशव बळीराम हेडगेवार आणि मा. स. गोळवलकर गुरुजी येतात. त्यांनी अस्पृश्यतेला विरोध पण जातिसंस्थेच्या समर्थनाद्वारे हिंदू धर्मात समरसतेचा संकेत दिला. यामुळे या उतरंडीस धक्का न लागता ती कायम राहिली असती. अर्थात या संस्कृतीकरणाच्या प्रक्रियेत एक घटक सक्तीचा होताच. हिंदू समाजाच्या रांगेत उच्चस्थान मिळविण्याकरिता विशिष्ट कर्मकांड अनिवार्य होते आणि कर्मकांडातील दर्जा जातिवर्गाच्या दर्जाशी सुसंगत असणे आवश्यक होते. या दोन्ही पद्धती स्वतंत्र असल्या तरी त्या समांतर असाव्या, हे अपेक्षित होते.

या संस्कृतीकरणाच्या प्रक्रियेतून समाजातील गतिमान जाती आपल्या दुर्दैवी ज्ञातिबांधवांशी संबंध तोडून स्वतःची प्रगती करून हिंदू समाजाच्या सत्ताक्रमात चढत जातात. ही परिवहनीयता वाटते तशी सार्वत्रिक नव्हती. उदा., एकाच भाषिक गटात आणि जातीय गटात वेगवेगळे भेद दिसून येतात. उदा., बुटींचा दर्जा एकूण चरक ब्राह्मणांपेक्षा आर्थिक दृष्टीने उच्च होता. चिटणीसकुटुंबाचा दर्जा चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंपेक्षा उच्च होता. फक्त ब्रिटिशकालीन मानववंश शास्त्रज्ञांच्या वर्गीकरणाच्या प्रवृत्तीमुळे स्थिर समाजाची प्रतिमा निर्माण झाली. वस्तुतः जात, वर्ग आणि सत्ता यांचे गतिमान संतुलन होण्याची प्रवृत्ती दिसते.[१७]

अग्रेसर परिवहन जातिगटास सापेक्ष उच्च स्थान देऊन जातीच्या सामाजिक उतरंडीच्या संघटनेस त्याचे आव्हान शून्य करण्यात आले. पण जातीय किंवा वर्गीय दृष्टीने ते कनिष्ठ श्रेणीतच राहिले. त्यांच्या कर्मकांडी उतरंडीला ब्रिटिश काळात कोणता प्रतिसाद राहिला? त्यांनी निषेध केला, पण हिंदु संस्कृतीचे वर्चस्व इतके जबर होते, की त्यांच्या कल्पनेवरही मर्यादा आल्या. त्यामुळे ते नैतिक कर्मकांडाच्या उतरंडीस आव्हान देऊ शकले नाही. त्यामुळे त्यांचा निषेधसुद्धा क्रमशः सहभागी करून घेण्यात आला किंवा बाजूला सारण्यात आला. या सक्तीच्या सनातनीपणामुळे जातिव्यवस्थेत संघर्ष नसल्याचा भ्रम निर्माण झाला. पण अस्पृश्य आणि जातीबाबत जात आणि वर्गस्थितीत आर्थिक व राजकीय शक्तीचे संपूर्ण नियंत्रण उच्च जातीत असल्यामुळे संघर्षाला वाव नव्हता. यामुळे १९३० च्या सुमारास दलित चळवळीने या सत्ताकेंद्रास खरे आव्हान दिले. हे खरे म्हणजे कनिष्ठ वर्ग आपल्या वर्गीय जाणिवा जातीय परिभाषेत व्यक्त करीत होता. म्हणून या चळवळीच्या

संदर्भात सुरेंद्रनाथ सेन यांनी १९३३ मध्येच म्हटले आहे, की दलित चळवळ ही जातीय समस्या नसून वर्गीय समस्या आहे. म्हणून मंदिरप्रवेश आणि सहभोजनाचा गांधीवादी प्रयोग ही समस्या सोडवू शकणार नाही.[१८] १९३२ पूर्वीचा दलित चळवळीचा कार्यक्रम आणि नंतरचा कार्यक्रम यावरून हे विधान अधिक स्पष्ट होते. दलित चळवळीने इतर कार्यक्रमासोबत अधिक राजकीय प्रतिनिधित्व, शिक्षण, रोजगार तसेच भूमिभाटकाचे अधिक सुविधाजनक अधिकार यांची मागणी केली. या काठी समाजातील सत्तासंतुलन बदलणे आवश्यक होते. पण अखेर या चळवळीमुळे वर्गीय पातळीवर विभाजन झाले व तिला एका बाजूला करण्यात आले. वर्ग आणि जात हे दोन्ही सामाजिक दृष्ट्या आणि सामान्य विचार दृष्ट्या एकमेकांना छेदू लागले. त्यामुळे या अग्रेसर परिवहनशील मध्यमवर्गीय नेत्यांना राष्ट्रीय राजकारणाच्या सत्तासंरचनेत सहभागी करून घेण्यात आले. त्यामुळे राष्ट्रीय चळवळ प्रबळ आरक्षणवादी झाली. सर्वसामान्य लोक सनातनी स्थितीस मान्य करू लागले, किंवा त्यांनी आपल्या आर्थिक व सामाजिक तक्रारीसाठी वर्गीय भाषा स्वीकारली. स्वातंत्र्योत्तर काळातील काँग्रेसने समाजाच्या नवशिक्षित कनिष्ठ आणि दलित वर्गातून आपले सामर्थ्य मिळविले. अशा तऱ्हेने त्यांना सत्तासंरचनेत स्थान मिळाले, तरी ब्रिटिश काळातील जातवर्गाची रचना ढोबळमानाने कायम होती.

ब्रिटिश काळातील कर्मकांडातील श्रेणी जवळपास समाजातील आर्थिक आणि सामाजिक सत्तेचे प्रतिबिंब होते आणि जेथे सुसंगती नव्हती, तेथे अग्रेसर गटास सत्तासंकुलात सहभागी करून घेण्यात आले. सवर्णांनी लोकसंस्कृतीवर आपले वर्चस्व स्थापन केल्यामुळे कर्मकांडाशिवाय श्रेणीची कल्पना करणेच शक्य नव्हते. कनिष्ठ श्रेणीसाठी वरिष्ठ जातीचे वर्चस्व जितके भौतिक होते, तितकेच बौद्धिक व नैतिक नेतृत्वाचे होते. त्यात एक समाजगट विरूद्ध गटास दडपून टाकतो. या जातीय--राजकीय वर्चस्वाचे मूळ उच्च श्रेणींच्या आर्थिक हालचालींच्या निर्णयशक्तीत आहे.[१९] ब्रिटिश काळातील ब्राह्मणी सत्तेस धार्मिक व व्यावहारिक असे दोन पैलू आहेत, असे महात्मा जोतीबा फुले यांनी म्हटलेच आहे.[२०] जेथे ब्राह्मणाच्या हाती व्यावहारिक सत्ता नव्हती, तेथे त्यांना व्यावहारिक सत्तेचा राजाश्रय उपलब्ध होता. दुसऱ्या शब्दांत राजकीय आणि धार्मिक सत्ता केंद्रित असलेल्या वर्गजातीच्या गटास या शोधपत्रात राजा-ब्राह्मणयुती म्हटले आहे. त्यांचे हिंदू समाज व त्यांच्या नैतिक सांस्कृतिक जगावर वर्चस्व होते. हिंदू समाजाची लोकसंस्कृती या सत्तारूढ गटाने इतकी बदलून टाकली आहे, की त्यामुळे उतरंड आणि वर्चस्वाच्या दर्शनास वैधता मिळालेली आहे. या सांस्कृतिक वर्चस्वामुळे कनिष्ठ श्रेणीच्या कल्पनाशक्तीला मर्यादा पडून त्यांनी आपली दुय्यम स्थिती आणि सामाजिक विषमता आपला कर्मविपाक किंवा नशीब म्हणुन स्वीकारली. अर्थात जातिव्यवस्थेतील विषमतेचा विरोध झाला नाही असे नाही. पण या विरोधाची व्याख्या सांस्कृतिक शब्दावलीत झाल्यामुळे या विरोधकांना क्रमशः वर्चस्ववादी व्यवस्थेत सहभागी करून घेण्यात आले किंवा कोपऱ्यात बसविण्यात आले. यामुळे जातीचे ऐक्य वर्गीय श्रेणींनुसार झाले आणि कनिष्ठ जातीतील पुरोगामी गट वर्चस्ववादी सत्तासंकुलात सहभागी करून घेण्यात आला. बाकीचे लोक पूर्वीच्याच सामाजिक-आर्थिक मागास स्थितीत राहिले.

**संदर्भ टिपा**


१. सिन्हा १९६८ : ९४
२. फेऊर १९६९ : १२
३. सिंग १९७७ : १२
४. डिसोजा १९६९ : ३५ उदृक्त सिंग १९७० : २३
५. हबीब १९६३ : ८३
६. कित्ता
७. धुर्य १९५७ : १७
८. जेकिन्स १८२७ खंड १ : १३ (१९२३)
९. इंण्डेन १९७६
१०. चक्रवर्ती, यु १९९०, मणी १९९०, कोहन १९६८
११. जंकिन्स खंड १ पृष्ठ ८१-८२, खंड २ पृष्ठ ५-७
१२. जंकिन्स खंड २ पृष्ठ ५, शेजवलकर खंड १ पृष्ठ ३२२ ले. २८२, विल्स पृष्ठ ९५
१३. वक्काणी १९८५ : ३५-३६
१४. लांडगे १९५४ : ३८
१५. बोस एस. सी. १८८३ : १६३







१६. राजवाडे खंड १० पृष्ठ २६९-२७० ले. ३३७

१७. लिन्च १९६९ : ९२

१८. सेन १९३३

१९. ओ. हेनलॉन १९८५ : २११

## Refrence Works (संदर्भ ग्रंथ)


1. Conlon Frarah T- 1981- The census of India as a source for the historical study of religion and cast, in Gerald Barries ed. The Census of British India, new Perspective, New Delhi.
2. Desai A. I (Ed.) - 1969. Rural Sociology India, Bombay.
3. D'Souza Victor - 1964 -"Measurment of Regidity, Fluidity, Dimidity of Social Stratification in six Indian Sociological Bulletin Vol. 18, No.1."
4. Dutt R. P. - 1949 - India Today, Reprint, Culcutta.
5. Ghurye G. S. - 1957 - Cast & Class in india, Bombay.
6. Jenkins R. - 1827 - Report on the teritories of Raja of Nagpur reprint 1923.
7. काळे या. मा. - १९३७ - नागपुर प्रांताचा इतिहास
8. लांडगे दे. गो. - १९५७ - नागपुरचा सांस्कृतिक इतिहास
9. Lynch, Owen - 1969 - The Politics of Untouchebility, Social mobility and Social change in a city of India.
10. O'Hallon Rosolin - 1985 - Caste, Conflict and Ideology, Mahatma Jyotiba Phule and Low cast protest in 19th century western India, Cambridge/ Hydrabad.
11. Sing - 1975 - Social Staratification and Change in India, New Delhi.
12. Sen N. N. - 1977 - Social Change in Morden India, Indian Edition, Oriental a longman's.
13. Shejwalkar T. S. (Ed.) - 1954 - Nagpur Affairs Vol. 1.




अनुक्रमणिका

# जागतिक अस्वस्थ लोकमानस : एक कारणमीमांसा

बाबूराव चंदावार

**प्रास्ताविक-**

असंतोषाच्या तीव्रतेतून उफाळून आलेल्या जगभरच्या शासन करणाऱ्यांच्या विरोधातल्या चळवळी पाहून वाटते, की जगातले लोकमानस अस्वस्थ झालेले आहे. पण, ही अस्वस्थता नेमकी कशातून येत असावी व आलेली असावी, हे जाणून घेण्याची तसदी मात्र फारशी घेतलीच जात नसावी, असे वाटते. कदाचित हे जाणून घेणे सहजसोपे नसेल ! पण, संवेदनेतून निरीक्षण व अवलोकन केले जाऊ शकते. यातून जे काही लक्षात येऊ शकेल, ते अर्थातच जाणून घेता येईल ! यामुळे असंतोषाच्या परिस्थितीतून आलेली अस्वस्थता आकलनात येऊ शकेल व समजूही शकेल.

**१. अस्वस्थतेच्या घटना तपासायला हव्यात**

या दृष्टीने जगातल्या लोकसमूहात एकत्र राहण्याची व जगण्याची संधीच कमी होत आहे किंवा काय, यावर विचार करायला हवा. कारण, ही संधी कमी होत गेल्याने किंवा संधी नाहीशीच होत गेल्याने सहजीवन शक्य होत नाही, हेच स्पष्ट होताना दिसते आहे ! तेव्हा, एकत्र राहण्याची व जगण्याची संधी असावयालाच हवी असेच जर मानले, तर अशी संधी का मिळत नसावी किंवा असलेली संधी का संपत आलेली असावी, याच्या कारणांचा शोध घ्यायला हवा. अनेक व्यक्तींनी एकत्र राहण्याची गरज सुरक्षेच्या भावनेतूनच प्रारंभाला वाटू लागली असावी. म्हणून एकापेक्षा अधिक व्यक्ती एकत्र आल्याने सुरक्षेच्या भावनेतूनच अशा सर्वांचे कुटुंब अस्तित्वात येऊ शकले असणार. या एकत्र येण्याला व कुटुंब अस्तित्वात आणण्याला सुरक्षेची भावनाच केन्द्रस्थानी व महत्त्वाची होती असे जरी मानले, तरी परस्परांविषयी वाटणारा आपलेपणा जो भावनिक आस्थेच्या आविष्कारातून येऊ शकला, हेच परस्परांना वाटणाऱ्या ओढीचे प्रमुख आकर्षणही होते. परस्परांना वाटणाऱ्या भावनात्मक ओढीतूनच कौटुंबिकता अस्तित्वात आली, ती नातेसंबंधही प्रस्थापित करू शकली. म्हणून, व्यक्तींमधले परस्परसंबंध हे आस्थेतल्या नातेसंबंधातलेच झाले व हाच सहजीवनाचा कौटुंबिक आधारही ठरला. असा हा सहजीवनाचा कौटुंबिक आधारच जेव्हा परस्परांत दुरावा वाढून नाहीसा होण्याची स्थिती निर्माण होते, तेव्हाच कौटुंबिक विघटन होत असते. म्हणजे विश्वासातल्या आस्थेच्या अभावातूनच हे होत असते. तेव्हा, समूहातल्या व्यक्तींच्या विश्वासातल्या आस्थेचे प्रमाण जेव्हा कमी होते किंवा ते घटू लागते, तेव्हा अविश्वासातून संबंधविच्छेदनाचा प्रारंभ होत असतो. जगातले लोकमानस अस्वस्थ होण्याच्या मुळाशी ही संबंधविच्छेदनाची परिस्थिती आहे. म्हणून, कौटुंबिक संबंधात विश्वासाचा अभाव होत जाणे व त्यामुळे कौटुंबिकता नाहीशी होण्याची प्रक्रिया सुरू होणे जागतिक अस्वस्थतेचे मूळ कारण आहे, असेच मानायला हवे. पण, प्रचलित विकासाच्या संकल्पनेत याचे महत्त्व मानलेच गेले नसावे व महत्त्व मानले जावे, असे वाटतही नसावे ! कारण, मानवीयतेचा संदर्भ विकासाला प्राप्त व्हावयाला हवा व तो अस्तित्वाचा असावयालाही हवा याची कल्पनाच केली जात नसावी, असे वाटते. म्हणून, मानवीयतेच्या संदर्भाविना जो विकास साधला जाईल किंवा साधला गेला आहे तो मानवीय विकासच नव्हे, असे म्हणता येऊ शकेल ! तेव्हा, अस्वस्थता ही जर मानवीयतेला नाकारण्यातूनच येत असेल, तर मानवीयतेच्या प्रस्थापनेतून दृढतापूर्वक ती दूर करता येऊ शकेल, असेच मानले जायला हवे ! सध्याच्या जगातली अस्वस्थता ज्या घटनांमधून अभिव्यक्त होत असते व अभिव्यक्त होताना दिसू लागते, त्या सर्व घटना याच दृष्टिकोनातून तपासून घ्यायला हव्या आहेत. कारण, याची गरज निर्माण झाली आहे. अर्थात, याला मानवीय गरज म्हणायलाही हवे








आहे !

**२ : मानवीयतेला नाकारण्यातून अस्वस्थता**

अत्याधुनिक विकासाचा आदर्श मानूनच ज्या देशातला विकास अचंबित होऊन जगाने स्वीकारला आहे, असे म्हणतात, त्या देशात अमेरिका सर्वांत वर उठून दिसते आहे. म्हणून अमेरिकेतल्या अस्वस्थ करणाऱ्या मानून ज्या घटनांचा जगभर वारंवार उल्लेख केला जातो आहे व केला गेलाही आहे, त्या घटना अर्थातच तपासून घ्यायला हव्यात ! यातूनच अचंबित करणाऱ्या अमेरिकेच्या विकासाचे रहस्य उलगडू शकेल व वस्तुस्थितीही कळेल ! जरी विकासाचा कसाही अर्थ लावला गेला, तरी माणसाच्या उपभोगाला अधिकात अधिक संधी ज्यातून उपलब्ध असते, त्यालाच विकास म्हटले जाते आहे. याच अर्थाने तो प्रतिष्ठित होऊ शकलेला आहे. म्हणून, भौतिकतेचा किंवा भौतिक साधनांचा विकास गृहीत धरूनच विकासाचे आराखडे तयार केले गेले व राबवलेही गेले आहेत. तेव्हा, आधुनिक विकास असा भौतिकतेच्या आस्थेतला व उपभोगातलाच झालेला आहे. माणसाला त्याच्या संरक्षण व विकासासाठी तसेच सुरक्षिततेसाठीही भौतिक साधनांची गरज असते व आहे. म्हणून, भौतिक साधने उपलब्ध व्हावीत म्हणून प्रयत्न करणे व त्यासाठी झटत राहणे अपरिहार्यच मानले जाते. पण, जीवन जगण्याची गरज पूर्ण करण्यासाठी आवश्यक मानूनच भौतिक साधने स्वीकारायची असतात व स्वीकारली जावी लागतात. यांत गरज व आवश्यकता महत्त्वाच्या मानल्या गेल्या आहेत. पण, गरज नसताना किंवा आवश्यकता नसताना जेव्हा भौतिक साधने बाळगली जातात किंवा त्यांचा अनावश्यक संग्रह केला जातो, तेव्हा त्या ठिकाणी गरज व आवश्यकता बाजूला सारून विलासितेला प्राधान्य देऊन तेच प्रतिष्ठित केले जाते व भौतिक साधने विलासितेसाठीच बाळगली जातात. अर्थात त्यांचा संग्रहही केलाच जातो ! तेव्हा गरज, आवश्यकता व विलासिता यांमधला भेद सारासार विवेक बाळगूनच लक्षात घ्यायचा असतो व लक्षात घ्यायला हवा ! पण, विकासाच्या संकल्पनेतच गरजा वाढवीत जाण्याला प्राधान्य व प्रोत्साहन दिले गेले आहे. कारण, गरजा वाढवत गेल्यानेच गरजेचे उत्पादन वाढणे शक्य होत असते म्हणतात ! म्हणून, गरजेचे उत्पादन वाढवीत ठेवण्यासाठी गरजा वाढवीत जाणेही गरजेचेच आहे, असे यात गृहीत धरले गेले आहे. यातून नेमक्या कोणत्या कारणासाठी गरजा वाढवायच्या असतात किंवा वाढवल्या जाव्यात याची स्पष्टता होत नाही, आजवर ती झालेलीही नाही. म्हणून, गरजपूर्ती व विलसिता यांपैकी कशाला प्राधान्य द्यायचे असते, असा प्रश्न यातून उपस्थित झाला आहे. हा प्रश्न जगण्याचा उद्देश व जगण्याचे प्रयोजन या दोन्हींशी सरळसरळ संबंधित आहे. म्हणून, जगण्याचा उद्देश व प्रयोजन स्पष्ट करून घेण्यासाठी यावर विचार करायला हवा. कारण, जगण्याचे प्रयोजन व उद्देश स्पष्ट करून घेतल्याशिवाय जगण्याची सार्थकता कशात आहे, हे कळू शकणार नाही. म्हणून, ज्यातून हे कळते व कळू शकते तेदेखील लक्षात घ्यायलाच हवे ! पण, जगण्याची सार्थकता म्हणजे नेमके काय, याचे आधिभौतिक व आध्यात्मिक पातळीवर वेगवेगळे अर्थ लावले गेले आहेत व याच्या सैद्धांतिक व तत्त्वज्ञानात्मक परंपराही निर्माण केल्या गेल्या आहेत. त्या पडताळून घ्यायला हव्यातच; पण या ठिकाणी सैद्धांतिकतेपेक्षा किंवा तत्त्वज्ञानात्मकते-पेक्षाही मानवीय उपयुक्तता लक्षात घेणेच अपेक्षित आहे. कारण, सिद्धान्त आणि तत्त्वज्ञान या दोन्ही मानवीय उपयुक्ततेच्या संदर्भात कितपत लक्षात घेतल्या जाऊ शकतात किंवा लक्षात घ्यायला हव्या असतात, याचा काहीएक अंत असू शकेल किंवा काय, हाही एक प्रश्न नेहमीच उपस्थित होत असतो. कारण, याचा कुठेही आजवर अंत लागलेला आहे. हे कोणालाच कळलेले नाही. म्हणून, हा एक निरंतरतेचा व न कळू शकणारा बौद्धिक व तात्त्विक व्यायाम म्हणायला हवा. पण, मानवीय उपयुक्तता मात्र जाणून घ्यायला हवीच आहे व ते मनुष्याच्या आकलनशक्तीच्या मर्यादेतलेच आहे, याविषयी शंका बाळगण्याचे कारणही नाही. मानवीय उपयुक्तता ही माणसाच्या आकलनातलीच नेहमी असू शकते व आहे. पण, आकलन होण्यासाठी जाणीव व्हावी लागते व बाळगावीही लागते. काही वेळेला गरजेनुसार जाणीव झिझवावीही लागतेच !

अनुक्रमणिका

### ३ : पराभूत मनोवृत्ती

अमेरिकेतल्या अलीकडच्या ज्या घटना अस्वस्थ करणाऱ्या मानल्या गेल्या आहेत, त्या या संदर्भातच उलगडायला हव्या आहेत. कनेक्टिकटमधील न्यूटाउन गावातील सॅण्डीहक एलेमेंटरी शाळेत एका माथेफिरूने केलेल्या अंदाधुंद गोळीबारात सत्तावीस जणांचा मृत्यू झाला. त्यात वीस लहानग्यांचा समावेश होता. या प्रकाराने संपूर्ण जगात खळबळ उडाली. यानंतर कन्यास प्रांतातील टोपेका येथे एका माथेफिरूने केलेल्या गोळीबारात दोन पोलिसांचा मृत्यू झाला. मुलांच्या हत्येने दु:खी होऊन अमेरिकेचे अध्यक्ष बराक ओबामा यांनी "एक राष्ट्र म्हणून आपण आपल्या मूलभूत कर्तव्यपूर्तीत कमी पडतो आहोत काय? स्वत:शी प्रामाणिक राहून या प्रश्नाची उत्तरे शोधण्याची वेळ आता आली आहे," असे उद्गार काढले. (न्यूयॉर्क पीटीआयचे १९ डिसेंबर २०१२ चे वृत्त.) माथेफिरूंच्या वतीने केल्या जाणाऱ्या हत्या अमेरिकेत सतत घडत आलेल्या आहेत व घडतच असतात! तेव्हा, 'माथेफिरू' हा शब्द विशेषत्वाने लक्षात घ्यायला हवा आहे. मी स्वतः १९८७ साली सतत सहा महिने अमेरिकेत वास्तव्य करून होतो. या वास्तव्यात मी शांतिवादी चळवळ (पीस मुव्हमेंट), नीग्रोंची चळवळ (ब्लॅक मुव्हमेंट) व शेतमजुरांची चळवळ (फार्मवर्कर मुव्हमेंट) अशा तीन चळवळी जवळून पाहिल्या व त्यांचा अभ्यास केला. यावरून काही निष्कर्षही मी काढलेले आहेत. अर्थात, जगात नावाजलेल्या विकसित अमेरिकेतल्या लोकांची जीवनपद्धती जी मला कळू शकली, त्यावरून निश्चितपणे काहीतरी मला सांगता येण्यासारखे आहे. यात 'माथेफिरूपणा' हा प्रकार अमेरिकेच्या जीवनपद्धतीतला एक अविभाज्य दुष्परिणामच असावा, या निष्कर्षाप्रत मला यावे लागलेले आहे. म्हणून जगाला अचंबित करणारा अमेरिकेचा विकास हा कोणत्याच मानवीय निकषावर खरा उतरणारा व जगाच्या शांततामय सहअस्तित्वासाठी आश्वासक म्हणताच येणार नाही. अर्थात, अनियंत्रित औद्योगिक विकास पावलेल्या जगातल्या कोणत्याही राष्ट्राविषयी-देखील हेच म्हणता येण्यासारखे आहे. यामुळे अमेरिकेतल्या लोकजीवनाविषयी तुच्छतादर्शक भाव माझ्या मनात मी बाळगलेला नाही. उलट, अमेरिकेतल्या लोकांविषयी करुणेचा भावच मी बाळगून आहे. पण, जगण्याचा उद्देश व प्रयोजन या दोन्हींविषयी विचार करताना अनियंत्रित औद्योगिक विकासामुळे मानवीयतेची इतकी पीछेहाट झालेली आहे, की यामुळे निर्माण झालेली उणीव कशी भरून काढता येईल, हा प्रश्न प्रामुख्याने जगाच्या भवितव्याच्या संदर्भात उपस्थित झालेला असून, तो अतिशय जाणवणारा झालेला आहे. म्हणून, जगाच्या भवितव्याचा विचार करताना 'जगबुडी' होईल म्हणून जे भविष्य वर्तवले जाते, किंवा 'प्रलयाची'ही कल्पना केली जाते, त्याचा अर्थही लावता यायला हवा. अर्थात, 'जगबुडी' चे भविष्य व 'प्रलय' या दोन्ही भीतिमूलकच आहेत. म्हणजे जगण्याची शाश्वती उरलेलीच नाही, हे यातून वर्तवले जाते आहे. पण, हा एक पराभूतपणाच आहे. म्हणून त्यावर विचार करण्यासारखे काही नाही, असेही म्हणता येऊ शकते. पण ते भीतिमूलकच असल्यामुळे ही भीती ज्या पराभूत मनोवृत्तीतून येते ती का निर्माण झाली असावी, याचाही विचार करायला हवा! अर्थात, विचार करता येईल व विचार करता येण्यासारखी परिस्थितीही आहेच!

माणूस पराभूत होत आहे व पराभूत होतच असतो. पण, हे नैराश्येतूनच होत असते व होत आलेही आहे. म्हणून, पराभूत होण्यापासून परावृत्त होण्याचा नैराश्य घालवणे हाच उपाय होऊ शकतो व व्हायलाही हवाच आहे. अर्थात, हे जग पराभूतांचे नाही; विजय संपादन करणाऱ्या विजयी योद्ध्यांचेही ते आहेच. हा आशावाद जागृत करायला व तो जागृत ठेवायलाही हवा आहे! पण, नैराश्यमुळे वैफल्य येत असते. म्हणून पराभूत झाल्याचे वाटत असते व जाणवतही असते. अर्थात, याची कारणे शोधून ती दूर करता येऊ शकतील. ती नेमकी कोणती कारणे म्हणता येतील, हेच जाणून घ्यायला हवे आहे!

### ४ : उपभोगालाच संस्कृती म्हणण्याची प्रथा

अमेरिकेचा इतिहास फार अलीकडचा आहे. अमेरिकेत वस्ती करून राहणारे मूळ निवासी ज्यांना 'रेड इंडियन' म्हटले जाते, ते आता शिल्लक उरलेले

नाहीत. पण, अमेरिकेत अनेक ठिकाणी 'रेड इंडियन हिल' अशा पाट्या लावून ठेवलेल्या दिसून येतील. या 'रेडइंडियनां' ना स्वतःची एक स्वतंत्र ओळख व परंपरा होती. त्याला संस्कृती म्हटले जाऊ शकते, पण असे प्रत्यक्षात म्हटले जात नाही. अमेरिकेवर युरोपातल्या दर्यावर्दीची दृष्टी पडली. अमेरिकेची नैसर्गिक रचना ही युरोपातल्या लोकांना स्वतःच्या समृद्धीचे साधन ठरू शकते, असेच वाटले. म्हणून युरोपातल्या लोकांनी अमेरिकेत जाऊन मूळ निवासींची जमीन व जगण्याची साधने आदींवर बळजबरीनेच स्वतःचे स्वामित्व प्रस्थापित केले. हे करताना मूळ निवासींचा नुसताच पराभव केला नाही, तर त्यांना निर्वंश करण्यासाठी त्यांची कत्तलही केली गेली म्हणतात! अशाच एका पद्धतीने युरोपातून गेलेल्या अनेक राष्ट्रांतल्या गोऱ्यांनी अमेरिकेवर ताबा मिळवला. पण युरोपातल्या लोकांना शेती करण्याचे ज्ञान अवगत नव्हते. कारण, युरोपातच हे ज्ञान त्या वेळी उपलब्ध नव्हते. शेती करण्यासाठी शेतमजूर हवे होते. ते जवळच्या मेक्सिको व आफ्रिकेतून आणले गेले मेक्सिकन शेतमजूर व आफ्रिकन नीग्रो गुलाम यांच्याच कार्यकर्तृत्वाचा उपयोग करून अमेरिकेत युरोपीयनांनी शेती करायला सुरुवात केली व ती करण्यासाठी यांत्रिक साधनांची निर्मितीही केली गेली व ती वापरली गेली. म्हणून, अमेरिकेतली शेती यांत्रिक शेती राहिलेली आहे. पण, भारतासह आशिया खंडात शेतीतून जशी संस्कृती अस्तित्वात आली, तसे अमेरिकेत झाले नाही. कारण, युरोपात संस्कृती अस्तित्वात येऊच शकली नाही. पण, नागरीकरण (सिव्हिलायझेशन) अस्तित्वात आलेच होते. अर्थात, अमेरिकेतली यांत्रिक शेती ही संस्कृती प्रसवू शकली नाही. कारण, शेतकरी--जीवनाचा संस्कार अमेरिकेला लाभलाच नाही. तेव्हा, युरोपातले नागरीकरण अमेरिकेत अस्तित्वात आले व बाजाराच्या यशस्वी विस्तारातून ते भरभराटीसही आले.या भरभराटीलाच अमेरिकन संस्कृतीही मानू लागले. लॉन्सिंग या मिशिगन राज्याच्या राजधानीच्या शहरात अमेरिकेतल्या कार्यकर्त्यांचे शिबिर झाले होते. त्यात माझे व्याख्यान झाले. त्यात मी "अमेरिकेत सर्वांत जास्त कागदांचा उपयोग केला जातो व कागदांचाच सर्वांत जास्त कचरा अमेरिकेतल्या घरांमधून साचलेला असतो. झाडे नष्ट करूनच कागदाचे उत्पादन केले जाते. यामुळे जगातले जंगल नाहीसे होत आहे,"असे म्हटले होते. याचा प्रतिवाद करीत एक तरुण उभा झाला व तो म्हणाला, "कागदांचा विपुल प्रमाणात वापर करणे, ही अमेरिकेची संस्कृती आहे." तेव्हा उपभोगालाच संस्कृती म्हणण्याची प्रथा अमेरिकेत पडलेली आहे. औद्योगिक विकास वा औद्योगिकीकरण हे उपभोगाच्या ओढीतूनच होत असल्यामुळे कोणतेही उत्पादन उपभोगासाठीच करावयाचे असते व या उपभोगातून कशाचेही व कुणाचेही शोषण झाले, तरी त्याकडे दुर्लक्ष करूनच ते स्वीकारायचेही असते, अशीच एक मानसिकता औद्योगिक उत्पादन-पद्धतीतून विकास साधला जाण्याच्या संकल्पनेतून अस्तित्वात आलेली असून अमेरिकेने यात उच्चांक गाठलेला आहे. म्हणून, उपभोगवादी जगण्याची पद्धती अमेरिकेत अस्तित्वात आलेली असून जगातली जीवनोपयोगी उत्पादने अमेरिकेच्या बाजारातल्या नियंत्रणात ठेवली जातात. म्हणून अमेरिकेतला बाजार जागतिक बाजारावर स्वतःचे वर्चस्व निर्माण करून आहे. कारण, बाजार हेच शोषणाचे प्रमुख साधन झालेले असल्यामुळे अमेरिकी साम्राज्यवाद अशा या बाजारवादाचेच फलित मानायला हवे आहे.

**५ : व्यक्तिस्वातंत्र्यातला 'माथेफिरूपणा'**

बाजारू लोकजीवन हीच अमेरिकेची खरीखुरी ओळख म्हणता येईल. यातून बाजारी शोषण मानवीय संवेदना नाहीशी करून अस्तित्वात येत असते, हे अमेरिकेच्या बाबतीत म्हणता येऊ शकते व म्हणायलाही हवेच आहे. अमेरिकेत ज्या 'माथेफिरूपणा'चे दिग्दर्शन व प्रदर्शन नेहमी होत असते, ते यातलेच असे म्हणणे वस्तुस्थितीला धरून होईल. या वस्तुस्थितीलाच अमेरिकेचे स्वातंत्र्य म्हणण्याची प्रथा पाडली गेली आहे. न्यूयॉर्कच्या समुद्रात स्वतंत्रतादेवीचा भव्य पुतळा उभारला गेला आहे. त्याला अमेरिकी जीवनपद्धतीला अपेक्षित स्वातंत्र्याचे प्रतीकच मानले जाते. अर्थात, स्वातंत्र्याची संकल्पना ही मुळात शोषणमुक्त स्थितीचीच मानली गेलेली आहे. अमेरिकेच्या लोकजीवनात मात्र याचे प्रतिबिंब उमटलेले प्रत्यक्षात कुठेही दिसून येत नाही. अर्थात,अमेरिकी

स्वातंत्र्याची संकल्पना ही मुळात बाजारकेन्द्रित असल्यामुळे यालाच जागतिक स्वरूप यावे अशीच धडपड अमेरिका करीत असते. पण या धडपडीला किंवा विस्तारालाच पुरोगामी विचारसरणीत 'साम्राज्यवाद' म्हटले गेले आहे. अर्थात, अमेरिकेत स्वातंत्र्याची ज्या तऱ्हेची लक्षणे दिसतात, ती जाणून घ्यायला हवीत.

जगातच स्वातंत्र्याचा स्वीकार केला गेला आहे. पण, कालमानानुसार स्वातंत्र्याचे वेगवेगळे रूप जगात सर्वत्रच दिसते. यांतलेच एक महत्त्वाचे रूप 'व्यक्तिस्वातंत्र्य' आहे. व्यक्तीचे स्वातंत्र्य व समाजातल्या अन्यांचे स्वातंत्र्य या दोहोंतला फरक जरी परिचयाचा म्हणता येऊ शकला, तरी 'व्यक्तिस्वातंत्र्य' व 'सामाजिक स्वातंत्र्य' या दोहोंत पूरक-पोषक संवादित्व असावयाला हवे, असेच मानले गेले आहे. म्हणून, व्यक्तीचे स्वातंत्र्य हे समाजाच्या स्वातंत्र्याला तसेच समाजाचे स्वातंत्र्य व्यक्तीच्या स्वातंत्र्याला बाधक होऊ नये, पूरक-पोषक राहावे, याची काळजी घेत राहणे गरजेचेच मानले गेले आहे. म्हणून स्वातंत्र्यात स्वैराचाराला परवानगी दिली जाऊ नये, अशी एक मान्यता जरी जगात प्रतिष्ठित केली गेली आहे, तरी अमेरिकेत ही मान्यता दुर्लक्षितच ठेवली गेली आहे. अर्थात, स्वातंत्र्याला निव्वळ व्यक्तिस्वातंत्र्यातच पाहिले जाणे अभिप्रेत असावे, अशीच एक दृष्टी अमेरिकेच्या लोकजीवनावर प्रभाव टाकून आहे. म्हणून, ज्याला सामान्यत: स्वैराचार म्हटले जाते त्यालाच अमेरिकेत व्यक्तिस्वातंत्र्य मानले जात असावे, असे प्रत्यक्षात दिसते आहे. हे स्वातंत्र्य इतके बीभत्स झाले आहे, की आईचा राग येऊन मुलगा आईवर पिस्तुलाची वा बंदुकीची गोळी सहजतेने झाडतो व आईला ठार करतो. असे अनेक व्यक्तिस्वातंत्र्याचे बीभत्स प्रकार अमेरिकेत पहायला मिळतात. म्हणून लहान मुलांसह कोणालाही शस्त्रे बाळगण्याची व मनाला येईल तसा त्यांचा उपयोग करण्याचे स्वातंत्र्य अमेरिकेत आहे, असे दिसून येते. यामुळे अनेक प्रकारच्या हिंसा अमेरिकेत घडून येत असतात.'सेक्स'चा मोठा प्रश्न अमेरिकेत उपस्थित आहे. म्हणून स्त्री-पुरुषांना स्वेच्छेने समागम करण्याचे स्वातंत्र्य दिले गेले आहे. मिशिगन राज्याच्या लॅंसिंग या राजधानीच्या शहरात एका बागेत (पार्क) मी बाकावर बसलो होतो होतो. माझ्याजवळ एक अमेरिकन युवक बसला होता. पुढच्या बाकावर एक युवती बसलेली होती. या दोघांत दृष्टादृष्ट झाली व दोघांनी परस्परसंमतीने लैंगिक वासनातृप्तीसाठी समागमाची इच्छा डोळयांतून व्यक्त केली. दोघेही उठले व शेजारच्या सर्व सोईंनी सज्ज अशा घरातल्या दारावर किल्ली ठेवली होती, ती घेतली व खोलीत समागम करून परत आले.समागमासाठीच अशा घरांची निर्मिती बागेत केलेली असते. याला अमेरिकेत कायदेशीर मान्यता दिली गेली आहे. हॉटेलसारखेच, फक्त रात्र घालवण्यासाठी 'मोटेल' हा एक प्रकार अमेरिकेत अस्तित्वात आहे. कोणत्याही स्त्री-पुरुषांना समागम करण्यासाठी या 'मोटेल' चा उपयोग केला जातो. तेव्हा, 'सेक्स' (लैंगिक तृप्ती) ला अमेरिकेत कायदेशीर मान्यता मिळालेली आहे. तेव्हा, उपभोगाच्या स्त्री-पुरुष समागमाच्या विलासी प्रवृत्तीला अमेरिकेत कायद्यानेच मुक्तद्वार दिले गेले आहे. अर्थात, कशाही प्रकारच्या उपभोगाला अमेरिकेत व्यक्तिस्वातंत्र्याच्या नावाखाली कायद्यानेच मान्यता दिली गेली आहे. याला गैरप्रकार वा अनैतिक प्रकार मानले जात नाही. पण, नैतिकता कायम असावी म्हणून संयमाला महत्त्व दिले जावे, अशीच एक मान्यता जगात आहे. अमेरिकेत याला महत्त्व दिले गेलेले दिसत नाही. म्हणून, व्यक्तिस्वातंत्र्यात अमेरिकेत तरी नैतिक भूमिकेतून संयमाला स्थान व महत्त्व दिले गेलेले नाही आहे. तेव्हा, स्वातंत्र्याचे महत्त्व मान्य करूनही व्यक्तिस्वातंत्र्य जे नैतिक दृष्ट्या स्वैराचारातलेच असू शकते व असते, त्यालाही मान्यता मिळायला हवी किंवा काय, हा प्रश्न अमेरिकेच्या लोकजीवनात अस्तित्वातच नाही; म्हणून तो महत्वाचा ठरलेलाही नाही. म्हणून विवाहबाह्य लैंगिक वासनातृप्तीला अमेरिकेत कायदेशीर मान्यता दिली गेली आहे. अशा अनेक बाबी आहेत, ज्या अमेरिकी जीवनपद्धतीत दिसून येतात व ज्यांची गणना स्वैराचारात केलीही जाऊ शकते. विवाहविच्छेद करून काडीमोड घेण्यासाठी 'डिवोर्स कोर्ट' चालवले जातात व त्याचे कार्यविवरण दूरदर्शनवर (टीव्ही) रोजच दाखवले जाते. विवाहानंतर काही कारणास्तव काडीमोड घेण्याचे प्रकार कमीजास्त

प्रमाणात जगात सर्वत्रच प्रचलित आहेत. पण अमेरिकेत आज विवाह झाला व उद्या काडीमोड घेतला गेला, असा जो अतिरेक विपुल प्रमाणात दिसतो आहे, तसा जगात मान्यता पावलेला नाही. पण भारतासह जगात सर्वत्रच याचे वारे वेगात वाहू लागले आहेत. म्हणून विवाहसंस्थाच नाहीशी होईल, असे वाटू लागले आहे. म्हणूनच विवाहाशिवाय एकत्र राहण्याला–ज्याला 'लीविंग रिलेशनशिप' म्हटले जाते आहे, याला विवाहबाह्य संबंध म्हटले जाऊ नये, असा आग्रहही धरला जातो आहे. तेव्हा, विकासाला जो अर्थ अतिऔद्योगिकीरण पावलेल्या देशांत आलेला दिसतो आहे, तो जागतिक सहजीवनाच्या दृष्टीने घातकच मानायचा किंवा काय, असा प्रश्न उपस्थित झाला असून, तो अतिशय जाचकही ठरताना दिसतो आहे. हा नुसता अनियंत्रित औद्योगिकीकरणाचाच परिणाम मानून चालत नाही. कारण, गुन्हेगारीचा प्रादुर्भावही यातूनच होत असतो व झालेलाही आहे, हेदेखील लक्षात घ्यायलाच हवे. म्हणून, उपभोगाच्या मनोवृत्तीला नको तेवढी व तशी चालना मिळू लागली म्हणून उपभोगाची तृष्णा वाढतच गेली व तिच्या वेगातून सांस्कृतिक ऱ्हासास कारणीभूत ठरणारी गुन्हेगारी अस्तित्वात येऊ लागली व ती वाढतच गेली आहे. म्हणून, औद्योगिकीकरणाच्या अनिष्ट परिणामातून गुन्हेगारीचे प्रमाण वाढत असल्याचे प्रत्यक्षात दिसून येते आहे. हे संस्कृतीचा अभिमान बाळगू इच्छिणाऱ्या व अभिमान बाळगणाऱ्या भारतातल्या महानगरांतूनही दिसून येत आहे! पुण्यासारखे महानगर जे सांस्कृतिक वैशिष्ट्ये जपणाऱ्यांचेच मानले जाते, त्या महानगरातही गुन्हेगारीचे प्रमाण भयानक रूप धारण करू शकले आहे. यात स्त्रियांवरील बलात्काराचे वाढते प्रमाणही आहे व ते संस्कृति-ऱ्हासाचेच प्रतीक मानले जाते आहे.

**उपसंहार**

परस्परसंबंधाविना सहजीवन घडून येत नाही. ते शक्यच होत नसते. कारण, नैतिक आधाराविना सहजीवनाला संधीच उपलब्ध होत नसते व उपलब्ध होतही नाही. म्हणून, स्त्री-पुरुष सहजीवन हे नैतिकतेचेच असू शकते व ते तसेच असावयाला हवे, याविषयी आस्थेवाईकपणे विचार केला गेलाच होता. याचीच परंपरा निर्माण झाली आहे. पण, ती मोडीत काढूनच जर नव्या पद्धतीने स्त्री-पुरुषसंबंध प्रस्थापित करायचेच असतील, तर ते कोणत्या आधारावर किंवा पायावर प्रस्थापित केले जावेत, याचे दिग्दर्शन या अशा नव्या पद्धतीतून व्हावयाला हवे आहे. पण, व्यक्तिस्वातंत्र्याच्या नावाखाली तडजोडीने एकत्र राहण्यालाच सहजीवन म्हणावयाचे असेल, तर त्याला स्वैराचाराचीच अभिव्यक्ती म्हटली जाईल व म्हणायलाही हवे आहे. कारण, स्वैराचारातून सहजीवन घडून येत नसते व घडून येतही नाही. ज्याला किमान स्थैर्याची खात्री नसते किंवा खात्री देता येणे शक्यच नसते, अशा वागण्याला किंवा एकत्र राहण्याला सहजीवन म्हणता येत नाही व म्हणूही नये. पण, विकासाची जी काही भोगवादी संकल्पना औद्योगिक विकासाच्या वेगातून अस्तित्वात आणली गेली आहे, ती जीवन सार्थकी लागावे या दृष्टीने उपयुक्त मानता येणार नाही व मानूही नये. अशीच ह्याची अवस्था झालेली आहे! म्हणून मानवीयतेला साजेसा विकासच स्वीकारला जाऊ शकेल. तो घडवायचा असेल, तर त्याला नैतिकतेचाच आधार घ्यावा लागेल. कारण, याविना जगाला स्वस्थता लाभू शकणार नाही. जगातल्या सर्वच व्यवस्था ज्या आधारावर विकासाची संकल्पना राबविताना दिसतात, तो आधार जगातल्या लोकांना सहजीवनासाठी आश्वासक वाटत नाही व वाटणारही नाही. व्यवस्थांच्या विरोधात उद्‌भवलेला जागतिक असंतोष यातून अंकुरलेला आहे व तो व्यवस्थांच्या विरोधात उपद्रवकारी होताना दिसतो आहे. यावर विचार केल्यास लक्षात येईल, की लोकांची नैसर्गिक अभिक्रमशीलता अव्हेरून शासकीय अभिक्रमतेवर शासन करणाऱ्यांनी अवलंबून ठेवण्यास सर्वच व्यवस्था लोकांना भाग पाडत असल्यामुळे शासकीय अभिक्रम लोकांना जाचक ठरलेले आहेत. म्हणून कोणत्याही शासकीय व्यवस्थांनी लोकांच्या स्वयंस्फूर्त नैसर्गिक अभिक्रमाकडेच वळायला हवे आहे. यातून सर्वच व्यवस्था लोकाभिमुख होऊ शकतील व व्यवस्थांमध्ये शासन करण्याची वाढती प्रवृत्ती किमान पातळीवर येऊ शकेल. यातून लोकांची शासननिरपेक्षता निर्माण होऊन ती वाढतच जाईल. हेच जागतिक शांततामय सहजीवन साधण्यात उपकारक ठरेल. म्हणून, लोकांवर

अनुक्रमणिका

अकारण शासन करण्याची व्यवस्था लादलीच जाऊ नये. कारण, की लादली गेल्यामुळे शासन सर्वंकष होत जाईल व यातून लोकजीवन गुदमरून जाईल. स्वत:चे स्वातंत्र्य नाहीसे होत आहे किंवा नाहीसे झालेच आहे, याचाच अनुभव लोकांना यातून येत राहील. म्हणून, शासन लादण्याचा व्यवस्थांचा दुराग्रह नाहीसा व्हायला हवा. अर्थात, तो नाहीसा झाला नाही, तर गुदमरले-पणातूनच शासनाच्या व्यवस्थेविरोधात बंडाळी माजत राहण्याची परिस्थिती निर्माण होत राहील. जगातल्या लोकांमध्ये दिसून येणारी व जाणवणारी अस्वस्थता याच अर्थाची आहे, हे जगातल्या व्यवस्थापक राज्यकर्त्यांनी वेळीच लक्षात घेणे गरजेचे झाले आहे.



---









# पाणीटंचाई-दुष्काळ-दारिद्र्याचे मूळ कारण प्रचलित विकासधोरण आहे

एच. एम. देसरडा

आजमितीला महाराष्ट्रातील किमान दोन कोटी लोकसंख्या व एक कोटी गुराढोरांना पाणीटंचाईने हैराण केले आहे. हंडाभर पाण्यासाठी आयाबहिणींना मैलागणिक पायपीट करावी लागते. पाळीव जनावरे व वन्य पशू पाण्यासाठी सैरावैरा भटकत आहेत. याउलट मुंबई-पुण्यात आजही माणशी २०० लिटर पाणी हमखास मिळत आहे. येथे पंचतारांकित हॉटेलमध्ये दर व्यक्तीसाठी किमान तीन हजार लिटर पाणी सहज वापरले जाते. महाजनअभिजनवर्गाचे जलतरंग, वातानुकूलित यंत्रे, मोटारगाड्या, कुत्री-मांजरे धुण्यासाठी धुलाई यंत्रासाठी महामूर पाणी वापरले जाते. २४×७ पाणीपुरवठ्याच्या योजना धनिकांच्या दिमतीला कार्यरत आहेत. मलबार हिल, मरीन लाइन्स, बॅकबे, नरिमन पॉइंट, कुलाबा, वरळी सी-फेस व तत्सम वस्तीत राहणारे उद्योजक, व्यापारी, मंत्रिगण, सनदी अधिकारी, न्यायाधीश, सिनेकलावंत सर्वांना महापूर पाणी, वीज, रस्ते, पार्किंग स्थळे, नेट-इंटरनेट, क्लब, पंचतारांकित दवाखाने, हॉटेले, विमानतळे, राजधानी-शताब्दीसारख्या खास रेल्वेसेवा, बँका, विमानसेवा ठायीठायी उपलब्ध करून देणे हे आमच्या प्रचलित 'विकास योजनांचे' प्रमुख उद्दिष्ट आहे.

वाढविस्तार व वैश्विकीकरण (ग्रोथ ॲण्ड ग्लोबलायझेशन) हे सध्या परवलीचे शब्द असून समस्त अभिजनवर्गांच्या मुखी एकच प्रभुनाम आहे : वाढविस्तार, उच्च विकास दर. हाच आमचा राष्ट्रीय महामंत्र आहे आणि महाराष्ट्र तर या विकासगाडीचे भन्नाट इंजिन आहे. ग्रामीण भागात व शहरी झोपडपट्ट्यांत (६० टक्क्यांहून अधिक नागरी (?) लोकसंख्या झोपडपट्ट्यांत वास्तव्य करते!) आज प्यायला पाणी नसले म्हणून काय? आम्ही विकास करत आहोत तो बिनदिक्कत करू दिला, तर त्यांनाही २४×७ सर्व काही मिळेल. अर्थात तोपर्यंत या गोरगरिबांनी आमचे बिनधास्त उघडे-नागडे (ट्रान्सपरन्ट) उठणेबसणे, खाणेपिणे, हसणे, खेळणे, लोळणे २४×७ चॅनलवर पाहावे! कशाला फिकीर करता नळाच्या पाण्याची? बाटल्या विकत घ्या. जय महाराष्ट्र!

**नाव जनतेचे, लाभ धनदांडग्यांना!**

मुंबई-पुणे-ठाणे-नाशिकपट्टाच कशाला? अगदी नागपूरपासून कोल्हापूरपर्यंत मोठ्या शहरांना बिनबोभाट मुबलक पाणी मिळतेच; एवढेच काय, मराठवाड्यात गावोगावी भलेही हंडाभर पाण्यासाठी दंगेधोपे होण्याची वेळ आली असली, तरी औरंगाबादकरांना जायकवाडीचे पाणी दोन दिवसांआड का होईना, माणशी १०० लिटर दराने पुरविले जाते. अर्थात त्यात वीस टक्क्यांना दरडोई २००० लिटर तर गरीब वस्त्यांत फक्त १०-२० लिटर पाणी मिळते. नाहीतरी आपली सगळी सार्वजनिक पाणी-वीज-रस्ते-आरोग्यव्यवस्था फक्त वरच्या वीस टक्क्यांसाठीच राबविली जाते. या सेवांच्या पुरवठ्याचा हिशोब व गणित करताना एकंदर लोकसंख्या हे गुणाकाराचे घटक असतात. एकदा ही सुविधा उभी राहिली, की लाभधारकांच्या भागाकारात फक्त वरचे २० टक्के लोक असतात. हे सत्य नाकारण्यात काय हशील?

औरंगाबादलगतच्या जालना शहराची परिस्थिती सध्या फार असामान्य आहे. तिथे महिन्यातून एकदा नळाद्वारे पाणीपुरवठा होतो! थोडीफार आरडाओरड होत असली व परवा स्थानिक आमदाराने रस्त्यावर येण्याचा कलगीतुरा केला, तरी लोक पाण्यामुळे शहर सोडून गेले, असे झाले नाही. ऐपतदार मंडळींनी आपली खासगी टँकरची सोय करून घेतली. कसे चालवता याची विचारणा केली असता एकाने फार मासलेवाइक उत्तर दिले: 'आम्ही उंटाचे लिव्हर बसवून घेतले आहे.' काही फिकीर नाही. सहज मनात प्रश्न आला – महिन्यातून एक दिवस पाणी येऊन भागत असेल, तर मग २९ दिवस आम्ही नासाडी करत असतो, असे मानायचे का? आता पुरवठा भडीमार करणारी जायकवाडीची पाईपलाइन शहरोशहरी आणणे हा पर्याय कितपत संयुक्तिक आहे? भरीस भर म्हणून औरंगाबादसारख्या

हजार कोटी रुपयांच्या समांतर पाईपयोजनांची मागणी होत राहील.

उदाहरणादाखल परत जालना शहराचाच प्रश्न घेतला, तर गत काही वर्षांत सीड् कंपनीवाल्यांनी व लोखंड, स्टील रिरोलिंग कारखानदारांनी पाणीपुरवठ्याच्या तलावाच्या व शहराच्या परिसरातील पाणलोटाच्या क्षेत्रातील पाणी कूपनलिका व भूपृष्ठीय साठे करून भरमसाठ प्रमाणात उपसायचा व वापरायचा सपाटा लावल्यामुळे आड, विहिरी, घरातील कूपनलिका, जुन्या निझामकालीन पाणीयोजनांचे स्रोत आटले, साठा संपला, साठवण निकाली निघाली. याला पालिका वा राज्य प्रशासनाने कधी रोकले नाही. आजीमाजी लोकप्रतिनिधी व मंत्र्यांनी याला विरोध केला नाही!

**जालना शहराचे उदाहरण**

यावरून आपण काय बोध घ्यायचा? जालना तशी धनिकसेठांची नगरी; मात्र तेथील पालिकेने पाण्याचे वीजबिल दिले नाही, याचा अर्थ पाणीपट्टी नीट आकारून वसुली करून पूर्तता केली नाही. पाणी पेटले. सरकारने ३६ कोटी माफ केले, २१० कोटी रुपये खर्चाची योजना केली. म्हणजे आता जायकवाडीच्या पाण्यावर जसे औरंगाबाद शहर विस्तारले (४० वर्षांत दोन लाखांची लोकसंख्या पंधरा लाख झाली), तसे जालना वाढवायचे! जोवर आपण या प्रकारच्या बांडगुळी वाढविस्ताराला विकास (?) मानतो, तोवर या दुष्टचक्रातून बाहेर पडणे सुतराम शक्य नाही. पुरवठ्याचा भडीमार करणारी (सप्लाय साइड अप्रोच) पद्धती अखत्यार करतो, तोवर नियोजित-संतुलित-विकेंद्रित विकासाची भाषा व्यर्थ आहे. अर्थात पाण्यासारख्या जीवनावश्यक बाबींची समाधानकारक पूर्तताहमी आवश्यक आहे, याविषयी दुमत नाही. लोकांचे हाल होता कामा नयेत.

यासाठी शहराकडे लोक स्थलांतर का करत आहेत, याचा नीट परामर्श घेणे आवश्यक आहे. शेती कुंठित होणे, शेतीक्षेत्राचा राष्ट्रीय उत्पन्नातील वाटा लक्षणीय प्रमाणात घसरणे, खेडी ओस पडणे, जीवितार्थाची हमी नसणे या बाबींमुळे मजबुरीने लोक महानगरांकडे स्थलांतर करतात. अर्थात तेथेही झोपडपट्ट्यांत त्यांच्या वाट्याला अधिक बकाल व अमानवी जीवनच असते. 'करे कोई, भरे कोई', अशी हातावर पोट असणाऱ्या कष्टकऱ्यांची स्थिती आहे. मुकी बिचारी...

तात्पर्य, प्रचलित विकासप्रक्रियेचा मुळातून फेर-विचार करून त्याची दिशा आमूलाग्रपणे बदलणे नितांत गरजेचे आहे. भारतासारख्या लोकसंख्येची घनता असलेल्या या देशाला नजीकच्या भविष्यकाळात किमान निम्या मनुष्यबळाला शेतीवरच उदरनिर्वाह करावा लागेल. सोबतच औद्योगिकीरणाचे प्रारूप हे विकेंद्रित असावयास हवे. कास्तकारी व दस्तकारी यांद्वारेच भारतात विकेंद्रित व संतुलित विकास शक्य आहे.

**स्थानिक-स्वस्त-सुरक्षित पर्याय**

याचे प्रमुख सूत्र पाणी व ऊर्जेचे स्रोत हे स्थानिक व स्वावलंबी असावे. हे खचितच इष्ट व आवश्यक आहे. कोणत्याही गाव-शहराने परिसर-नैसर्गिक पाणलोटाच्या पाण्यावरच आपल्या गरजपूर्तीची व्यवस्था केली पाहिजे. तसे करणे सहज शक्य आहे. मलिकंबरने औरंगाबाद शहरासाठी अशीच अभिनव योजना केली होती. जालन्यासह अनेक लहानमोठ्या शहरांतही अशाच व्यवस्था होत्या. लांबलांब अंतरावरून पाणीपुरवठ्याच्या योजना व त्यासाठी वीज ही पद्धती मुळात चुकीची आहे.

तात्पर्य, पाणी-विजेची उधळामाधळ करणारी शेती व औद्योगिक उत्पादनपद्धती व चैनचंगळवादी जीवनशैलीला सोडचिठ्ठी देऊन जमीन, पाणी, वने, कुरणे, जैवविविधता यांसारख्या नैसर्गिक संसाधनांचा समतामूलक शाश्वत विकास केल्याखेरीज वाढत्या लोकसंख्येच्या मूलभूत भरणपोषण गरजा तसेच सुखसमृद्धी साध्य करणे असंभव आहे.

सर्वप्रथम यासाठी विकासाची पुनर्व्याख्या करून समता व सातत्य ही विकासाची कसोटी मानली पाहिजे. वाढवृद्धी म्हणजे विकास नव्हे. किंबहुना निरर्थक वाढवृद्धी ही खऱ्याखुऱ्या मानवी विकासाला बाधक व मारक आहे. चैनचंगळवादाला चौफेर चालना देणारी विकासविषयक धोरणे अमलात आहेत, तोवर मौलिक नैसर्गिक संसाधनांची वाताहत थांबवणे शक्य नाही. मोटारवाहन उद्योग हे याचे मासलेवाइक उदाहरण आहे. सद्य:स्थितीत सर्वाधिक महत्त्वाची बाब म्हणजे हवामान

बदलाचे वास्तव गांभीयाने लक्षात घेऊन पर्जन्यचक्र, जलउपलब्धता, शेतीव्यवस्थेवर व एकंदर मानवी जीवनावर होणाऱ्या परिणामांचा वस्तुनिष्ठ विचार करून प्रचलित औद्योगिक उत्पादनरचना, हरितक्रांतीची रासायनिक शेती, भोगवादी जीवनशैली यांत सत्वर ठोस बदल केले पाहिजेत. त्याखेरीज तरणोपाय नाही. याला उत्तर तंत्र-वैज्ञानिक नाही, तर सामाजिक-पर्यावरणीय आहे, हे विसरता कामा नये!

पाणी व ऊर्जा हे विकासाचे पायाभूत स्रोत आहेत, याबाबत दुमत होण्याचे कारण नाही. मुख्य म्हणजे सर्वांची पाणी व ऊर्जागरजा भागवणरी पर्यायी पद्धती सुदैवाने सहजसाध्य आहे. ती अधिक स्वस्त, जलद, व सुरक्षित आहे. याचा सारासार सम्यक विचार करून विकासाच्या अफलातून बाता व बृहद्वादाला तिलांजली देऊन स्थानिक व समन्वयी शाश्वत पाणी, अन्न, ऊर्जा, स्वास्थ्य, आवास शिक्षणविषयक पर्याय जाणीवपूर्वक अमलात आणण्यासाठी सामूहिक कृतीसाठी आपण सज्ज व्हावे, हाच या मानवनिर्मित पाणीटंचाईचा इत्यर्थ आहे.





अनुक्रमणिका






# कुरुंदकरप्रणीत धर्मनिरपेक्ष महात्मा गांधी

दत्ताहरी रामराव होनराव

लो. टिळकांनंतर गांधीजींचा राजकारणात उदय झाला. सामुदायिक प्रार्थनेद्वारे सर्वधर्मसमभाव प्रस्थापित करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. सामान्याला धार्मिक वाटणारे पण प्रत्यक्षात धर्मविरोधी, धर्मनिरपेक्ष असणारे गांधीजी हे सहज न समजणारे गूढ आहे. नरहर कुरुंदकर म्हणतात, 'म. गांधी हे कमालीचे संकीर्ण व्यक्तिमत्त्व आहे. भारतांत ज्याप्रमाणे एका बाजूला अजून धातूचा वापर न शिकलेले आदिवासी व दुसऱ्या बाजूला अणुभट्ट्या आहेत व भारत एकाच वेळी अश्मयुगापासून अणुयुगापर्यंत वावरतो, तसे गांधीचे आहे. धार्मिक आणि धर्मविरोधी, सनातनी आणि आधुनिक, पौर्वात्य आणि पाश्चिमात्य, स्वप्नाळू आणि व्यवहारी अशा अनेक सूत्रांनी बनलेले, जीवनाइतकेच भव्य आणि आत्मविसंगतीने भरलेले असे गांधीजींचे व्यक्तिमत्त्व होते. हे गांधीजी आपल्या जीवनाची पहिली पन्नास वर्षे कमालीचे स्वामिनिष्ठ होते. जिथून माणसाची नवविचारक्षमता गोठू लागते, तिथून गांधी ह्या व्यक्तिमत्त्वाला नवपालवी फुटू लागते. जुना गांधी भूत वाटावा असा नवा गांधी जन्माला येतो. पहिल्या मोहनदासाच्या संपूर्ण विरोधी आणि जितका विरोधी तितकाच सुसंगत.'[१] 'अतिशय प्रतिगामी, स्थितिवादी आणि जुनाट मध्ययुगीन नेते म्हणून गांधीजींकडे पाहता येते व या मूल्यमापनाला त्यांच्या वाङ्मयातच वाटेल तेवढे आधार काढून दाखविता येतील.'[२]

हे कुरुंदकर मान्य करतात. गांधीजींचे विचार उद्धृत करून काहीजण त्यांना स्वप्नाळू, व्यवहारशून्य, भ्रामक विचारांचे; एवढेच नाही, तर भोंदू व लबाडही ठरवितात, हेही ते सांगतात. कुरुंदकर म्हणतात, 'केवळ त्यांनी वेळोवेळी केलेली भाषणे पाहून किंवा त्यांच्या सुट्या वाक्यांचा विचार करून त्यांच्याकडे पाहता येणार नाही. गांधीजी वेळोवेळी काय बोलले यासाठी त्यांची वाक्ये पाहताना, गांधीजींनी कशाचे नेतृत्व केले. त्यांचा देशावर काय परिणाम झाला, हे पाहिल्याशिवाय गत्यंतर नाही. त्यांनी उभारलेल्या चळवळी, त्यांचे देशावर झालेले परिणाम, त्यांच्याशी सुसंवादी असणाऱ्या त्यांच्या वाक्यांनाच त्यांचे मूल्यमापन करताना महत्त्व आहे. उरलेल्या विसंगत बाबी गांधी या व्यक्तीच्या मनातील अंतर्विरोध म्हणून दुर्लक्षित करणे, फारतर क्षम्य मानणे भाग आहे.'[३]

या संदर्भात ते प्रश्न विचारतात, 'गांधीजी हिंदूंच्या धार्मिक परिभाषेत स्वातंत्र्य व समतेचा आशय सांगतात, आणि पारमार्थिक भाषेत राजकारण मांडतात. या भाषाशैलीतले शब्द बाजूला सारून आपण असा प्रश्न विचारला पाहिजे, की गांधीजींनी जे राजकारण केले, त्याचा परिणाम सर्वसामान्य जनतेच्या समतेच्या आकांक्षा प्रज्वलित होण्यात झाला, की देशातील परंपरावाद्यांचे हात बळकट होण्यात झाला?'[४]

गांधीजी चातुर्वर्ण्याबद्दल काय बोलले याऐवजी 'त्यांनी राजकारणात कोणत्या मनोवृत्ती प्रबल केल्या हे पाहून त्यांच्या समाजसुधारक कर्तृत्वाचा अंदाज बांधायला पाहिजे,'[५] असे कुरुंदकर म्हणतात. त्यांचा एकूण निष्कर्ष व इशारा असा, की 'या माणसाचे शब्द जुने होते. त्याचे कार्य, त्या कार्याचा परिणाम, त्याच्या मनातील आशय या बाबी आपण विसरलो, तर मग सोईस्करपणे आधुनिक भारताचा राष्ट्रपिता सर्व प्रतिगाम्यांना आपला संत म्हणून पचविण्याची संधी सापडते.'[६]

म. गांधी धार्मिक नसून धर्मनिरपेक्ष आहेत, ही गोष्ट कुरुंदकरांनीच मांडलेल्या गांधीजींच्या धर्मविषयक भूमिकेतून लक्षात येते. गांधीजी 'सर्वधर्मसमभाव' मानीत, सर्वधर्म सारखेच खरे आहेत असे मानीत; तर इतर परंपरावादी मात्र 'प्रत्येकाने आपापला धर्म पाळावा', असे म्हणत, असे सांगून त्यातील फरक सांगताना कुरुंदकर लिहितात, 'प्रत्येकाने आपापल्या परंपरागत धर्माप्रमाणे वागावे, असे आपण म्हणतो. तेव्हा प्रत्येक धर्माचा परंपरागत आचार त्या त्या अनुयायांसाठी रास्त आहे, असे आपण मानतो. ही कल्पना कितीही गोड असली,







अनुक्रमणिका

तरी ती परंपरा जतन करू इच्छिणाऱ्या स्थितिवाद्यांची कल्पना आहे. सर्वधर्मसमभावाची कल्पना याहून निराळी आहे.'[७] कुरुंदकरांचा पुढील तर्कवाद असा, की 'सर्वधर्मसमभाव मानला म्हणजे नवा धर्म काढता येत नाही.' 'धर्मांतर करता येत नाही.' गांधीजींची ही भूमिका किती धर्मद्रोही आहे, हे मांडताना कुरुंदकर म्हणतात, 'सर्व जग इस्लाममध्ये आणण्याची इच्छा करणाऱ्या तबलीगवाल्यांना गांधीजींची कल्पना पटणे कधीच शक्य नव्हते... त्यांच्या दृष्टीने ही भूमिका म्हणजे धर्मावर कुठिराघात आहे... आपला स्वतःचा धर्म सर्वांत जुना, सर्वश्रेष्ठ आणि सर्वांत पवित्र आहे, अशी हिंदूंचीही कल्पना होती....गांधींजींच्या सर्वधर्मसमभावाच्या कल्पनेला सनातनी हिंदूंचा मनातून याहीमुळे विरोध होता, की हिंदुधर्माच्या निरपवाद पूज्यतेला गांधीजी धोक्यात आणीत होते.'[८]

कुरंदकरांचा तर्कवाद येथेच संपत नाही. 'सर्व धर्म सारखेच खरे आहेत', या गांधीजींच्या वाक्याचा आणखी अर्थ सांगताना ते पुढे म्हणतात, 'सगळेच धर्म खरे असल्यामुळे सगळ्या धर्मांत एकच शिकवण आहे, म्हणून जर कुणीही माणूस आपल्या स्वतःच्या परंपराप्राप्त धर्माप्रमाणे खरोखरी वागण्याचा प्रयत्न करू लागला, तर त्यामुळे आपल्या धर्माचा खरा अनुयायी होणारा माणूस आपोआप जगातील सर्व धर्मांचा अनुयायी होऊन जातो. गांधीजी स्वतः असे समजत की, खरे हिंदू होण्याचा त्यांचा प्रयत्न चालू असल्यामुळे ते खरे शीख, खरे लिंगायत तर होतच आहेत; पण खरे मुसलमानही होत आहेत.....कुराणावर श्रद्धा न ठेवता एक माणूस उरलेल्या सर्वांच्यापेक्षा चांगला मुसलमान होतो, ही कल्पना मुसलमानांना....व हिंदूंनाही पटत नसे. सर्व सनातनी हिंदू गांधींना धर्मनाशक समजत, याचे हे एक कारण आहे. उलटया बाजूने म्हणायचे तर गांधींजींच्या मते हिंदू, मुसलमान व ख्रिश्चन हे खोटे हिंदू, खोटे मुसलमान व खोटे ख्रिश्चन आहेत. सर्व धार्मिकांना गांधीजी काट्याप्रमाणे सलत याचे कारण ही भूमिका आहे.'[९]

कुरुंदकर याचा निष्कर्ष मांडतात की, 'गांधीजींची सर्वधर्मसमभावाची कल्पना ही सर्व धर्मांतील परंपरावादी शत्रू आणि धर्मप्रामाण्याची विध्वंसक कल्पना आहे. व्यावहारिक पातळीवर गांधीजींच्या घोषणेचा अर्थ सर्वच धर्म सारखे खोटे आहेत, असा होतो.'[१०] ते लिहितात, 'गांधीजींसारखे लोक पवित्र असतात, संत असतात, आध्यात्मिक असतात; पण खऱ्या अर्थाने धार्मिक कधीच नसतात. प्रथमदर्शनी पाहताना हा माणूस सर्वधर्मांचा पूजक दिसतो; पण बारकाईने पाहताना हा माणूस सर्वधर्मांचा पूजक नसून तोच सगळ्यांत मोठा शत्रू असतो, असे दिसू लागते. हा मुद्दा कसा विक्षिप्तपणाचा व एकदम विसंगत वाटू लागतो; पण ते एक फार महत्त्वाचे सत्य आहे.'[११]

अशा प्रकारे गांधींजींना अधार्मिक व आधुनिक ठरवून शेवटी कुरंदकर अभिप्राय नोंदवितात, 'या खंडप्राय देशात एक धर्मातीत शासन उभे करावे व ते उभे करणे शक्य व्हावे, या दृष्टीने आवश्यक असणारे वातावरण सातत्याने निर्माण करण्याचा प्रयत्न कुणी केला नव्हता; तो गांधींजींनी केला.... गेली २५वर्षे जातिधर्मातीत शासन या देशात आपण चालवू शकलो आहोत, हा गांधीजींचा नवभारताला मिळालेला फार मोठा वारसा आहे.'[१२]

**संदर्भ टिपा :**


१. कुरुंदकर नरहर, 'राष्ट्रवाद आणि समाजवाद', संगत प्रकाशन, नांदेड, २००८, पृ. १०.

२. कुरुंदकर नरहर, 'आकलन', देशमुख आणि कंपनी, पुणे, आ. १ली, १९८५, पृ. ११७.

३. तत्रैव, पृ. ११८.

४. तत्रैव, पृ. १२०.

५. तत्रैव, पृ. १२१.

६. तत्रैव, पृ. १३६.

७. तत्रैव, पृ. १२४.

८. तत्रैव, पृ. १२४.

९. तत्रैव, पृ. १२५.

१०. तत्रैव, पृ. १२६.

११. कुरुंदकर नरहर, 'जागर', देशमुख आणि कंपनी, पुणे, १९६९, पृ. १२१.

१२. कुरुंदकर नरहर, 'आकलन', उनि. पृ. १२८.




अनुक्रमणिका

# कालाय तस्मै नमः

म. अ. मेहेंदळे

### १. त्रेतायुग

रामायणकथेत सीतेचा शोध घेण्यासाठी निघालेल्या मारुतीला रावणाच्या अशोकवनिकेत तिचे दर्शन घडते. मारुती ज्या उद्देशाने अशोकवनिकेत फिरत होता, तो सफल झाल्यानंतर रावणाला खिजवण्यासाठी त्याने रावणाच्या उपवनाचा विध्वंस केला.तिथले सारे शोभिवंत वृक्ष उपटून टाकले, वापी फोडून टाकल्या, कृत्रिम पर्वत जमीनदोस्त् केले. मारुतीने केलेल्या उपवनाच्या या नाशासाठी परंपरेने त्याला दोष दिला नाही. उलट, श्रीसमर्थ रामदासांच्या 'संकट निरसन' नामक मारुतीस्तोत्रात (भीमरूपी महारुद्रा वज्र हनुमान मारुती इत्यादी) मारुतीला 'वनारि' (वनाचा शत्रू) असे संबोधून त्याचा गौरवच केला आहे. त्रेतायुगात रावणाच्या उपवनासारखी अनेक उपवने असतील. त्यामुळे एखाद्या उपवनाच्या विध्वंसाने पर्यावरणाची मोठी हानी होणार होती असा भाग नसल्यामुळे मारुतीच्या वागण्यात परंपरेला दोषार्ह असे काही वाटले नाही. 'पर्यावरणाची हानी' यासारखे प्रश्न तेव्हा उद्‌भवलेच नसावेत.

### २. द्वापरयुग

द्वापरयुगातील महाभारतकथेत कृष्णार्जुनांनी केवळ एखादे उपवनच नव्हे, तर सारे खांडवनच जाळून टाकले. तसे करण्याचे कारण महाभारतात सांगितले आहे ते असे, की कृष्ण व अर्जुन वनविहारासाठी बाहेर पडले असताना अग्नी एका ब्राह्मणाच्या रूपाने त्यांच्याकडे आला व त्याला भूक लागली असल्याचे त्याने कृष्णार्जुनांना सांगितले. त्याची भूक शमविण्याची विनंती मान्य केल्यावर अग्नीने आपले खरे रूप प्रगट केले. भूक भागविण्यासाठी सारे खांडववन खाण्यास मागितले (महा.१.२१४-१.२१५). द्वापरयुगात कृष्णार्जुनांनी खांडवनाला आग लावून दिली त्यासाठी कारण म्हणून जे सांगितले आहे, ते सारे बालिश आहे हे उघड आहे. कृष्णार्जुनांनी खांडववनास आग लावून ते भस्मसात केले, हे सत्य आहे. खांडववन लहानसहान नव्हते. ते जळायला सहा दिवस लागावेत एवढे ते मोठे होते.

डॉ. इरावती कर्वे त्यांच्या 'युगांत' पुस्तकातील 'मयसभा' या प्रकरणात 'हा संहार का?' असा प्रश्न उपस्थित करून (पृ. १३५) त्याची काही उत्तरे देण्याचा प्रयत्न करतात. त्यांतले 'रानातील माणसे व जनावरे ही सर्वच शिकारीला योग्य, अशी कृष्णार्जुनांची भूमिका होती का?' हे उत्तर त्यांना ग्राह्य वाटते.

मला हे उत्तर योग्य वाटत नाही. कृष्णार्जुनांनी केवळ गंमत म्हणून सारे खांडववन जाळून टाकले असे वाटावे, असे खांडववनदाहाचे महाभारतातले वर्णन आहे. त्यामुळे संभवणाऱ्या पर्यावरणदूषणाचा प्रश्न तेव्हा उद्‌भवला नव्हता.

### ३. कलियुग

या युगात एखाद्या उपवनाचा अथवा वनाचा नाश करण्यास कोणी धजावेल, अशी कल्पनादेखील करवत नाही. एखादे वन अथवा उपवन तर सोडाच; साधा वृक्षही तोडल्यास तो गुन्हा ठरू शकतो. पुण्यातील 'केसरीनगर' येथील एका बंगलाधारकाने उपवनविभागाची परवानगी न घेताच वृक्षतोड केल्याने त्याच्या विरुद्ध फौजदारी गुन्हा दाखल करण्यात आला (सकाळ Today, बुधवार, ३० मे २०१२ मधील बातमी ).

हे सर्व पाहिल्यावर मनात विचार येतो तो 'कालाय तस्मै नमः.'



# केंद्रीय अर्थसंकल्प २०१३-२०१४
## वचने किम् दरिद्रता?

शि. ना. माने

देशाचा अर्थसंकल्प हा इंजिन नसला, तरी तो लोहमार्गावर इंजिनच्या मागे धावणाऱ्या डब्यांच्या चाकांना योग्य वेळी व योग्य प्रमाणात वंगण पुरविण्याचे कार्य करतो. सध्या भारतात ती योग्य वेळ आहे प्रत्येक वर्षातील २८ फेब्रुवारी हा दिवस. योग्य प्रमाणाची कामचलाऊ व स्थूल अशी पुढील व्याख्या करता येईल. कमीत कमी झीज किंवा घर्षणात पूर्ण क्षमतेने माल किंवा प्रवासी वाहून नेणे. पुढे योग्य ठिकाणी मानवरूपी विकासासाठी (Human development) आवश्यक असणाऱ्या पोषणद्रव्यांच्या (Nutrients) संबंधात या व्याख्येचा अन्वयार्थ स्पष्ट केला आहे. तोपर्यंत ही ढोबळ व्याख्या स्वीकारून पुढे जाऊ.

येथे आपण २८ फेब्रुवारी २०१३ रोजी मांडलेल्या केंद्रीय अर्थसंकल्पाचे एका वेगळ्या दृष्टिक्षेपातून विश्लेषण करण्याचा प्रयत्न करणार आहोत. म्हणजे त्यात कर, कर्ज, तूट, महसुलाची क्षेत्रवार वाटणी, बचत, गुंतवणूक, भावफुगवटा इत्यादी एरवी महत्त्वाच्या असणाऱ्या संज्ञांना थोडी बगल देण्यात आली आहे. आणि त्याचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे वित्तमंत्र्यांनी त्यांच्या अर्थसंकल्पीय भाषणाच्या सुरुवातीच्या ७ व्या व ८ व्या परिच्छेदांत स्पर्श केलेले विकासाचे विविध परंतु विसंवादी आयाम. युपीए सरकारच्या विकासविषयक प्रतिमानाशी प्रतिबद्धता, स्वतः वित्तमंत्र्यांची वृद्धीच्या मूलमंत्राशी अविचल धारणा व नोबेलविजेते अर्थशास्त्रज्ञ जोसेफ स्टिगलिट्झ यांचे त्यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या *द प्राइस ऑफ इनइक्वालिटी* या जागतिकीकरणाचे कडवे खंडन करणाऱ्या पुस्तकातील एक बोचरे किंवा आंबट (Acerbic) विधान यांचा सूचक उल्लेख करण्यात आला आहे.

युपीए सरकारचा मूलमंत्र स्पष्ट करताना वित्तमंत्री म्हणतात, "समावेशक व पोषणक्षम विकासाकडे नेणारी अधिकतर वृद्धी हे आमचे ध्येय आहे." पुढे लगेच ते म्हणतात, "वृद्धी ही आवश्यक अट आहे व उच्चतम ध्येय म्हणून आपण निर्विकल्पपणे वृद्धीचा स्वीकार केलाच पाहिजे...." "वृद्धीशिवाय विकासही नसेल व समावेशकताही नसेल." परंतु नंतर वृद्धी म्हणजे अंतिम निर्णय नव्हे, अशी कबुली देताना ते पुढील सावध विधान करतात. "भारताची बहुसांस्कृतिकता (Plurality) व विविधता (Diversity) आणि अनेक शतकांची उपेक्षा, भेदभाव व वंचितता यांच्याकडे जर विशेष लक्ष दिले नाही तर लोकांचे अनेक समूह मागे पडतील." या विधानाला पुस्ती जोडताना वित्तमंत्री पुढील स्मरण करतात, "मानवरूपी विकासनिर्देशक सुधारण्यावर विशेष जोर देऊन युपीए सरकार समावेशक विकासावर विश्वास व्यक्त करते. मी आशा करतो, की हा अर्थसंकल्प त्या प्रतिबद्धतेचा आणखी एक पुरावा असेल."

युपीएच्या प्रतिमानाच्या माध्यमातून वित्तमंत्री वृद्धीवर जेवढा जोर देतात, तेवढेच विकासाला आनुषंगिक (Adjunct) स्थान देतात. भाकरीचा आकार वाढल्यानंतर प्रत्येकाच्या वाटणीच्या चतकोराचा आकार आपोआप वाढतो. पहिली वृद्धी (उत्पादन), तर दुसरे वितरण. अशा प्रकारे उत्पादन-वितरण या जुन्या वादाचे अधून-अधून नवीनीकरण होत असते. रोनान्ड कोजसारखे अर्थशास्त्रज्ञ उत्पादनाचे 'सीमातिकीकरण' (Marginalisation) झाले आहे, असा युक्तिवाद करतात, त्या वेळी त्यांना असे सूचित करावयाचे असते, की उत्पादनवादी मानव संसाधनांची विल्हे लावण्याच्या (Allocation of human resources) नादात विल्हे लावण्यातील कार्यदक्षतेची (Allocative efficiency) योग्य दखल घेत नाहीत. परिणाम? उत्पादनावर जोर देऊनही साधनसंपत्तीच्या कार्यदक्षतेच्या अभावी प्रत्येकाचा भाकरीच्या चतकोराचा आकार वाढत नाही. विशेषतः भारतासारख्या विकसनशील देशांपुढे ही एक गंभीर समस्या निर्माण झाली आहे. आणि मानव संसाधनांसाठी

अनुक्रमणिका

केवळ सोपीव, वेतनी कामांचा (Jobs) पुरवठा करून ही समस्या सुटण्याऐवजी जास्त गंभीर होत जाणार आहे. वित्तमंत्र्यांनी मागे उल्लेख केलेल्या विकासाच्या विविध विसंवादी आयामांचा हा अन्वयार्थ आहे.

वृद्धी व विकास या संज्ञांमधील साध्य-साधन सीमारेषेच्या संदिग्धतेचे निरसन न करता नोबेलविजेते अर्थशास्त्रज्ञ जोसेफ स्टिगलिट्झ यांच्या उपरिनिर्दिष्ट पुस्तकातील पुढील विधानाचा दाखला देऊन वित्तमंत्री युपीएच्या प्रतिमानाला सहेतुकपणे अधिकतर पीळ देत नाहीत ना? स्टिगलिट्झ म्हणतात, "पोषित वृद्धी हवी असेल, तर समन्यायाच्या (Equity) तत्त्वाला नैतिक अशी एक सशक्त बाजू असावी लागते. देशाची सर्वाधिक महत्त्वाची साधनसंपत्ती असते त्या देशाचे लोक." दुसऱ्या शब्दांत, वृद्धी या आर्थिक संज्ञेचा विस्तार नैतिकतेपर्यंत झाला. वृद्धीचा इतका पीळ किंवा ताण देशाच्या अर्थसंकल्पाला मानवेल? परंतु दुसरी व अर्थसंकल्पासाठी नवी दिशा देणारी गोष्ट अशी, की देशाच्या कार्यकारी वयोगटात मोडणाऱ्या सर्व व्यक्ती (नोकरीतील व बेकार) केवळ परिव्यय (Cost) नसून त्या साधनसंपत्तीदेखील आहेत. स्पष्टीकरणासाठी काही वर्षांपूर्वी प्रत्यक्ष अनुभव घेतलेल्या एका कंपनीचा उल्लेख करू.

कंपनीचा व्यवस्थापकीय संचालक महत्त्वाकांक्षी व अवसरवादी होता. फायद्याचे श्रेय स्वतःचे व तोट्यासाठी कर्मचारी जबाबदार (हेड आय विन अँड टेल यू लूज), असे त्याचे वर्तन होते. कंपनीत संघभावना कमी झाली. दुरावा वाढत गेला. उत्पादनावर वाईट परिणाम झाला. खप घटला. पडीक क्षमतेचा (Idle capacity) प्रश्न निर्माण झाला. उत्पन्नापेक्षा परिव्यय वाढत गेला. कारणांचा शोध सुरू झाला. तथाकथित अतिरिक्त कामगारकपात हा समितीचा निष्कर्ष होता. या निष्कर्षाला कामगार संघाने विरोध केला व न्यायालयात आव्हान दिले. स्वतंत्र तज्ज्ञ समिती नेमण्याचा न्यायालयाने आदेश दिला. यथावकाश तज्ज्ञ समितीचा पुढील निकाल आला : पूर्ण क्षमतेने चालणाऱ्या कारखान्यातील काही कामगार अचानक अतिरिक्त ठरतात कसे? सामान्य परिस्थितीत कामगारांकडून काम करवून घेणे व्यवस्थापनाचे कर्तव्य आहे. त्यात ते कमी पडले. कंपनीतील कामगारांकडे साधनसंपत्ती (Resource) म्हणून न पाहता निव्वळ परिव्ययाच्या संकुचित दृष्टिकोनातून पाहिल्यामुळे कामगार-कपातीचा कपोलकल्पित प्रश्न निर्माण झाला.

येथे हा निकाल विस्ताराने देण्याचे एक कारण आहे. विशेषतः भारतातील कार्यकारी लोकसंख्येचे (Working population) जीवन व पोषण यांच्या संबंधात निकाल लक्षणीय ठरतो. अर्थात त्यातही एक गोष्ट अभिव्यक्त (Revealed) असली, तरी तिच्याशी संबंधित अनेक महत्त्वाच्या गोष्टी तिच्याखाली दडल्या आहेत. संक्षेपात त्यांचाच विचार करू.

जाताजाता वित्तमंत्र्यांनी आपल्या अर्थसंकल्पीय भाषणात तीन वचनांचा समावेश केला आहे (परिच्छेद १११ ते ११४). पहिले वचन आहे स्त्रियांची सुरक्षा (Freedom from harm and injury) व निर्भयता (Freedom from fear). दुसरे आहे युवक व युवती यांच्यासाठी कौशल्य विकास कार्यक्रम आणि तिसरे आहे गरिबांसाठी थेट लाभ (रोख रक्कम) हस्तांतरण योजना. येथे आपण दुसऱ्या वचनावर लक्ष केंद्रित करणार आहोत. कारण त्याचा थेट व कार्यात्मक सहसंबंध मानवरूपी साधनसंपत्तीशी आहे.

परिच्छेद ११३ मध्ये वित्तमंत्री प्रस्तावरूपात राष्ट्रीय कौशल्य विकास निगमाला (National Skill Development Corporation) सांगतात, की त्याने निरनिराळ्या कौशल्यांच्या प्रशिक्षणासाठी मानके (Standards) व पाठ्यक्रम (Curriculum) निश्चित करावेत. कौशल्य-प्रशिक्षित युवक व युवती रोजगारयोग्यता (Employability) व उत्पादकता यांना मोठ्या प्रमाणावर चालना देतील. १०,००,००० युवक-युवती कार्यप्रेरित होतील या गृहीतावर या महत्त्वाकांक्षी योजनेसाठी रु.१००० कोटी राखून ठेवण्यात येणार आहेत. वित्तमंत्र्यांच्या या प्रस्तावित योजनेचे कोणीही सुज्ञ स्वागतच करील. त्याचबरोबर पुढील काही गोष्टी नजरेआड राहू नयेत. (१)आजपर्यंत कौशल्ये, अन्नद्रव्ये व शक्तता (Capabilities) यांचा विकास करणाऱ्या महत्त्वाच्या प्रश्नाची योग्य दखल घेण्यात आली नाही, अशी अप्रत्यक्ष कबुली वचनात देण्यात आली आहे. आज शेकडो खाजगी व सरकारी अभियांत्रिकी महाविद्यालये आहेत. प्रत्येक

वर्षी त्यांत नवी भर पडतच आहे. परंतु जवळजवळ ६७ टक्के पदवीधर अभियंत्यांकडे रोजगारयोग्यता नाही. हे विदारक चित्र बदलण्याची गरज आहे. (२) राष्ट्रीय कौशल्य विकास निगम मानके व पाठ्यक्रम निश्चित करणार, त्यांना युपीए सरकारकडून मंजुरी मिळणार, दहा लक्ष युवक-युवती प्रशिक्षित होणार व अखेरीस त्यांना निरनिराळ्या व्यवसायांत नेमणूक मिळणार. यासाठी काही काळ लागेल. (३) येथे आणखी एक धोका संभवतो. आपणास माहीत आहे, की काही वर्षांपूर्वी पी. चिदंबरम वित्तमंत्री असताना त्यांनी संपादनात्मक अर्थसंकल्पाची (Performance budget, outcome budget) संकल्पना मांडली. वित्तीय लक्ष्ये व प्राकृतिक लक्ष्ये यांच्यातील वाढती तफावत आटोक्यात आणणे हा या संकल्पनेचा एक चांगला हेतू होता. त्या दृष्टीने ठरावीक काळात आढावाअहवाल तयार करून तो मांडण्याची प्रत्येक मंत्रालयावर जबाबदारी सोपविण्यात आली. दुर्दैवाने जन्मतःच मृतघोषित मुलाप्रमाणे (Stillborn child) या योजनेचा निकाल लागला. वित्तमंत्र्यांच्या अर्थसंकल्पातील क्र. ३ च्या वचनाची अशी गत होऊ नये, अशी अपेक्षा करू. आणि या योजनेसाठी तरतूद केलेल्या रु १००० कोटींची अवस्था 'पेरणीस आणले चणे। त्याचे केले फुटाणे।।' अशी होऊ नये, एवढीच आशा करू.

**समारोप :-**

'इंडियन इकॉनामी इज चॅलेंज्ड', 'वि विल सून गेट आउट ऑफ टफ', 'इंटरनॅशनली कॉंपिटिटिव्ह, इफ़िशिअंट अँड वेल-रेग्युलेटेड', 'इन्क्लुजिव डेव्हलपमेंट', 'सस्टेनेबल ग्रोथ', 'इक्विटी' इत्यादी शैलीदार शब्दांचा वारंवार वापर करून देश प्रगत व समृद्ध होत नाही. मागील पाच दशकांतील विकसनशील देशांचा आर्थिक इतिहास त्याचा पुरावा आहे. सांजाची कसोटी सेवनात असते, वर्णनात नव्हे. म्हणून विशेषतः लोकतंत्रात प्रतिनिधींनी ज्ञानदेवांच्या शब्दांत '....शब्दाची व्याप्ती तेणें पाडें। अनुभवावी।।,' अशी विनंती. लोकानुनयवादी वचने देण्यापूर्वी प्रत्येकाने वचनातील शब्दांच्या पलीकडील व्याप्ती समजून घेणे व ती अनुभवणे श्रेयस्कर असते. जसे बचकेएवढे सूर्यबिंब समजण्यासाठी प्रथम त्रिभुवनापलीकडील त्याच्या प्रकाशाची व्याप्ती अनुभवावी लागते.



---



अनुक्रमणिका

## लेखकांचा परिचय

- **डॉ. नीळकंठ गोपाळ मेंढे**

अर्थशास्त्राचे निवृत्त शिक्षक. अर्थशास्त्रविषयक वाचन-स्वाध्ययन-लेखन आजपर्यंत सुरू.

*पत्ता :-* पांढुर्णा नाक्यामागे, मु. पो. वरुड, जि. अमरावती. भ्रमणध्वनी-९४२२६२४५९६

- **प्रा. रमेश पानसे**

प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ. काही वर्षे अर्थशास्त्राचे पदव्युत्तर स्तरावरील प्राध्यापक. ग्राममंगल संस्थेकरवी आदिवासी भागात व अन्य ठिकाणी शिक्षणविषयक प्रयोग. आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व साहित्य या विषयांवर विपुल लेखन. सुमारे ३० पुस्तके व ५००च्यावर लेख प्रसिद्ध.

*पत्ता :-* ३१५, प्राज्ञपाठशाळामंडळ, गंगापुरी, वाई ४१२ ८०३ भ्रमणध्वनी : ९८८१२०८६९

- **डॉ. प्रभाकर गद्रे**

इतिहासाचे निवृत्त प्राध्यापक, धुळ्याच्या राजवाडे संशोधन मंदिरात संशोधनाचे काम करतात.

*पत्ता :-* राजवाडे संशोधन मंडळ, राजवाडे पथ, गल्ली क्र.१, धुळे ४२४ ००१,
दूरध्वनी :०२५६२-२३३८४८.

- **श्री. बाबूराव चंदावार**

समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक.

*पत्ता :-* सईनगर २, डी. १, फ्लॅट-१३, सिंहगडरोड, पुणे-४११ ०३० दूरध्वनी :०२०-२४२५०६९३ .

- **प्रा. एच. एम. देसरडा**

महाराष्ट्र राज्य दुष्काळ निवारण व निर्मूलन मंडळाचे उपाध्यक्ष. पाणी-पर्यावरण प्रश्नाचे अभ्यासक. नियोजन मंडळाचे माजी सदस्य.

*पत्ता :* ४०१, मीत अपार्टमेंट, नवाबपुरा, मोंधा रोड, औरंगाबाद ४३१ ००१. भ्रमणध्वनी : ०२४०-२३५६९९७.

- **प्रा. दत्ताहरी रामराव होनराव**

राज्यशास्त्र विभागप्रमुख, श्री हावगीस्वामी महाविद्यालय, उदगीर.

*पत्ता :-* श्री हावगीस्वामी महाविद्यालय, उदगीर. भ्रमणध्वनी : ७५८८०६७९१६.

- **डॉ. म. अ. मेहेंदळे**

पुणे येथील सुविख्यात डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्थेत पंचवीसहून अधिक वर्षे संस्कृतचे प्राध्यापक. आंतरराष्ट्रीय दर्जाचे, प्राच्यविद्येत मौलिक संशोधन करणारे पंडित. विविध विषयांतील जटिल प्रश्नांवर मराठीतून लिखाण.

*पत्ता :-* प्ररोह ५४, प्रशांत हौसिंग सोसायटी, पौड रस्ता, कोथरुड, पुणे ४११ ०३८.

- **श्री. शि. ना. माने**

अर्थशास्त्राचे निवृत्त शिक्षक, स्वाध्ययनावर विशेष भर, माजी अध्यक्ष, मराठी अर्थशास्त्र परिषद, मागील ४५ वर्षे अर्थशास्त्रात अखंडितपणे लेखन.

*पत्ता :-* १२, दर्शन, सहयोग गृहनिर्माण संस्था, गोरखपूर, सातारा-४१५ ००३.

रजिस्टर क्र. **11697/57**

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत
२० नोव्हेंबर २००६
पासून लागू

| | |
|---|---|
| ■ **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु |
| ■ **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु |
| ■ **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु |
| ■ **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु |
| ■ **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ** | ६० रु |
| ■ **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु |
| ■ **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी | १५० रु |
| ■ **वागीश्वरी** । डॉ. गो. के. भट | ६० रु |
| ■ **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे | ४० रु |
| ■ **इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती)** । सदाशिव आठवले | १३० रु |
| ■ **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| ■ **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी | १४० रु |
| ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| ■ **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प. ल. वैद्य | ५० रु |
| ■ **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| ■ **पाच पुस्तक-परीक्षणे** । वा. म. कुलकर्णी | ६० रु |
| ■ **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर | ३० रु |
| ■ **कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य** । रा. भा. पाटणकर | १०० रु |
| ■ **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि. के. बेडेकर | ३० रु |
| ■ **आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्व आणि विचार** | १०० रु |
| ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** | १५० रु |
| ■ **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे. पुं. रेगे | १२० रु |
| ■ **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** | २०० रु |
| ■ **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| ■ **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु |
| ■ **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र** : भारतीय संदर्भात विवेचन । द. ना. धनागरे | ४० रु |
| ■ **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| ■ **हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा** (दुसरी आवृत्ती) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| ■ **पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास** (दुसरी आवृत्ती) : प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |
| ■ **साहित्याचे तर्कशास्त्र** : सीताराम रायकर, द. दि. पुंडे, पंडित टापरे. | ७५० रु |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)फो:(०२१६७)२२०००६

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून
सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हे मासिक ... प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन ४१२८०३ येथे छापून ... मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई